# चमत्कारिक गोष्टी.

## भाग ४ था.



हें पुस्तक.

## नारो आपाजी गोडबोले

यानीं तयार केलेलें

त्यांचे

रत्नप्रसारक छापखान्यांत छापिलें.

ता. २० मार्च १८८८.

किंमत ८ आणे.

# अनुक्रमणिका.

# चमत्कारिक गोष्टी

## भाग ४ था.



मागील विषय पुढें चालू.

( गोपाळपंत प्राप्त झाले असतां रामशास्त्री म्हणतात. )

**रामशास्त्री:-** गोपाळपंत दादा आज कोणीकडे येणें केलें?

**गोपाळपंत:-** शास्त्रीबावा मागील श्राद्ध विचार पुरा होणें राहिला आहे, आज कामा काजांत थोडी फुरसत होती म्हणून आपले कडे आलों जर आपल्यास वेळ असेल तर कृपा करून माझ्या कांहीं शंकांचें समाधान करावें.

**रामशास्त्री:-** फार उत्तम आहे, आपण पुसावें आणि आह्मीं न सांगावें असें नाहीं. कोणी कांहीं शास्त्रार्थ विचारल्यास आम्हीं आपलीं फार जरूरीचीं जरी कामें असलीं तरी तीं एकीकडे ठेवून त्यांस सांगत असतों आणि आजतर तसें कांहींच नाहीं रिकामपणाच आहे मग आळस कां? चालूंद्या.

गोपाळपंत.– शास्त्रीबावा, आपण ब्राह्मणाचे तीन वर्ग पूर्वी मला सांगितलेत त्याचा मी आज बहुत दिवस विचार केला परंतु पहिले वर्गा प्रमाणें तर ब्राह्मण मिळणें फार कठीण व दुसरे वर्गा पैकीं क्वचित् मिळाले तर ते कोणी श्राद्धास बसत नाहींत, कोणी म्हणतात आम्हीं परान्न घेत नाहीं; तेव्हां श्राद्ध करणारानें कसें करावें ? तिसरे वर्गाचे मात्र ब्राह्मण पुष्कळ मिळतात परंतु ते उपयोगी नाहींत, असें धर्मशास्त्राचें मत तेव्हां मला असें वाटतें कीं, ब्राह्मण पवित्र पाहिजेत म्हणून आपण सांगितलेंत तसे यजमान पवित्र असले तर ठीक आहे; नाहींतर "यथाराजा तथाप्रजा" या वाक्याप्रमाणें जसे आह्मी यजमान तसे आम्हांस ब्राह्मण म्हटले म्हणजे तिसरे वर्गाचेच शोभतात.

रामशास्त्री.– अहो गोपाळपंत, आपण ह्मणतां हें खरें परंतु पदरचेंतर सांगावयाचें नाहीं ना, जसें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे त्याप्रमाणें वागावें मग जसें होईल तसें होवो. तुह्मी म्हणतां यजमान लक्षण युक्त असावे परंतु चांगला लक्षणयुक्त यजमान असून ज-

र दरिद्री असला तर त्याचे हातून काय घडावयाचें आहे? तर दात्याचें लक्षण पहाण्याची गरज नाहीं. फक्त तो चांगला कुलवान् असून अन्यायानें द्रव्य मिळविणारा नसला म्हणजे झालें आणि त्याजकडे पुण्याचा वांटा असतो, तसें याचकाचें नाहीं. तो प्रतिग्रह घेतो यामुळें त्याचें पुण्य यजमानाकडे जातें; परंतु जर याचकाजवळ मुद्दलच पुण्य नसलें म्हणजे तिसरे वर्गांतील ब्राह्मण असला तर त्याजपाशीं पाप अगर पुण्य असेल तें यजमानाकडे जातें म्हणून तसले ब्राह्मण उपयोगीं नाहींत हें आंतील वर्म आहे. जसें मनुष्याचे आंगांत सर्दी झाली असतां उष्ण उपचार करितात तो नियमित झाला तर सर्दी अगदीं नाहींशी होऊन प्रकृति चांगली बरी होते आणि उष्णोपचार अधिक झाला तर शरीरांतील शीत सरलें म्हणजे रक्ताकर्षण होतें त्या प्रमाणेंच हें ही आहे परंतु कोणाचे शरीरांत किती उष्ण व किती शीत आहे हें परीक्षेनें वैद्य जाणतात परंतु मनुष्याचें सुकृत अथवा दुष्कृत हें एक ईश्वर मात्र जाणतो, ज्याचें त्यास अगर दुसऱ्यास कांहीं समजत नाहीं यास्तव कोणतें ही दान करणें तें पुण्यवानासच करा-

वें त्यापासून झालें तर कांहीं पुण्य प्राप्त होईल नाहीं तर अधिक नुकसान नरी होणार नाहीं, उपोषित असेल त्यास एक वेळेनें अन्न व वस्त्ररहित असेल त्यास निर्वाह पुरतें वस्त्र हें कोणासही द्यावें. तेथें मात्र विचार पहाण्याची जरूर नाहीं. कारण, हे धर्म फक्त त्या प्राण्याचा आत्मा संतुष्ट झाला म्हणजे ईश्वर संतोष होऊन कीर्तीस पात्र होतो इतकेंच आहे.

**गोपाळपंत**:— त्या गरीब अनाथांविषयीं मला शंकाच नाहीं, तिसरे वर्गाचे ब्राह्मण हव्यकव्यास वर्ज केले आहेत आणि पहिले वर्गाचे व दुसरे वर्गाचे ब्राह्मण मिळत नाहींत तेव्हां पुढें काय करावें? ब्राह्मण मिळाला नाहीं तर श्राद्ध करावें किंवा न करावें?

**रामशास्त्री**:— हवे तसे ब्राह्मण जर मिळाले नाहींत तर चटश्राद्ध करावें परंतु श्राद्ध केलें पाहिजे आणि यजमान जर तिसरे वर्गाच्यांस बोलावीत नाहींसे होतील तर ते ही शुद्धीवर येऊन चांगले सदाचरणानें वागतील परंतु तसें कांहीं होत नाहीं. आधीं यजमानास धर्मशास्त्र कसें असतें हें माहीत नाहीं, त्यांचे आळसा

मुळें व गैर माहितीमुळें ब्राह्मण सांगणें तर उपाध्याया-
स किंवा भिक्षुकास सांगावयास सांगतात त्यांचा तर तो
व्यापार यामुळें त्यांना ज्या ब्राह्मणाकडून आमंत्रणें ये-
त असतात त्यांची फेड करण्याकरितां ते त्यांस आप-
ले यजमानाचे घरीं सांगतात या ठिकाणीं धर्मशास्त्र ते
मुळींच ध्यानांत आणीत नाहींत, कारण आणून उपयो-
ग काय? चांगला संपन्न ब्राह्मण म्हणजे पहिले वर्गां-
तील आहे आणि त्याजकडून आपल्यास कधींच आ-
मंत्रण येत नाहीं तर त्यास ते सांगत नाहींत. असा प्रका-
र आहे तो पूर्वींही सांगितलाच आहे व आतांही सांग-
तों. परंतु तुह्मीं आपले तीर्थरूपाचें श्राद्ध केलें तेव्हां-
ब्राह्मण सांगून केलें किंवा कसें केलें हें अगोदर मला
सांगा.

**गोपाळपंत.-** नेहेमीं जसें कोणी तरी ब्राह्मण
सांगून श्राद्ध करितों तसें केलें; परंतु दोन दिवस झाले
आमचे स्नेही आत्मारामपंत गोखले म्हणून आहेत,
ते श्राद्धास पांच ब्राह्मण सांगून अधेली अधेली दक्षि-
णा देतात म्हणून श्राद्धाचे अगोदर एक महिना पर्यं-

न ब्राह्मण हेलपटे घालूं लागले ते श्राद्धाचे आद्य दि-
वसा पावेतों सत्तर झाले त्यांजला तर सांगावयाचे ब्रा-
ह्मण पांच या मुळें ते संकटांत पडून कसें करावें ह्मणू-
न माझा सल्ला घेण्या करितां माझ्या घरीं येऊन हकीक-
त सांगूं लागले तेव्हां मलाही मोठें आश्चर्य वाटलें ते-
म्हणाले जर ते हेमी प्रमाणेंच पांच ब्राह्मण सांगून श्रा-
द्ध करावें तर पांसष्ट ब्राह्मणांचा मनोभंग होतो व ते-
शिव्या देतील. श्राद्ध न करावें तर पुत्रधर्म तो काय व-
लोक निंदा करितील कीं काय हो? अगस्त्याचा पुत्र तो
जवळ दोन पैसे असून बापाचें श्राद्ध देखील करीत-
नाहीं यामुळें त्याजला कांहीं सुचेना अक्कल गुंग हो-
ऊन गेली व पांसष्ट ब्राह्मण ह्मणतील गुलामाच्या घ-
रीं चार हेलपाटे घातले पण मला सांगितलें नाहीं. हें-
ऐकून मला कांहीं धर्मशास्त्र माहीत नाहीं पण युक्ति-
काढून संकट निवारण करावें अशी युक्ति सुचली ती
अशी कीं, जे ब्राह्मण हेलपटे घालून गेले त्या पैकीं ए-
कास ही बोलावूं नये त्याशिवाय वेगळेच पांच बोलावू-
न श्राद्ध करावें त्या पैकीं जेव्हां भेटतील तेव्हां त्यांस सां-

गावें कीं, पुष्कळ ब्राह्मण हेलपटे घालतात आणि सांगावयाचे पांच या योगानें बाकीच्यांचे मनोभंग व अपमान होतात ह्मणून मी आपले मनांत अगोदरच निश्चय करून ठेविला होता कीं, जे हेलपटे घालतील त्यांस मुळींच सांगावयाचे नाहीं. त्या प्रमाणें तुह्मीं हेलपटे घालणारांत होतां म्हणून तुह्मांस सांगितलें नाहीं. ज्यांणी हेलपटे घातले नव्हते त्या पैकीं पांच सांगितले होते असें सांगितलें म्हणजे त्यांस फारसें दुःख वाटणार नाहीं. व पुढें सावध होऊन पुढले वर्षी हा त्रास तुह्मांस होणार नाहीं. ही गोष्ट आत्माराम पंतास रुचली आणि त्यानीं तसें केलें पण ही गोष्ट कांहीं शास्त्र आधाराची आहे असें नाहीं. ही एक बोलावयास युक्ति काढिली तर या विषयीं आपलें मन कसें आहे.

**रामशास्त्री:-** वाहवा हो गोपाळपंत दादा, युक्ति तर सर्वोत्कृष्ट काढलीत आतां याप्रमाणेंच जर संपूर्ण गृहस्थ चालतील तर हा बंदोबस्त तेव्हांच होईल आणि भिक्षुकांस ही हेलपटे घालण्याचे श्रम पडणार नाहींत. आतां या तुमच्या युक्तीत जे अती याच-

* भद्र आहेत ते मात्र सांपडावयाचे नाहींत परंतु असे आशाळभूत याचक फारच थोडे आहेत. अहो तुम्हीं-गृहस्थानींच रीत सोडली म्हणून भिक्षुकांस सोडणें-प्राप्त झालें हें कोठें तुमचे ध्यानांत आहे. गरीबाचें नेव-दें उघडें करून दारवविनां येनें कोणतें ह्मणाल तर सां-गतों ऐका, मोठे मोठे संपन्न गृहस्थ आहेत ते वसंत पू-जा, मंत्र जागरणें अथवा लग्नकार्यांत सभा करून चां-गले विद्वान ब्राह्मण बोलावून आपले शक्ति प्रमाणें त्यां-स दक्षिणा देतात त्या वेळेस रमणानर नसतो ना? तो आपले शक्ति माफक कांहीं ब्राह्मण बोलवावयाचा नि-श्चय करून नावनिशीची यादी करितो आणि त्यांस-आमंत्रणें करवितो त्याठिकाणीं बोलावण्याशिवाय प्रतिष्ठीत सभ्य अथवा शिष्ट असें आपल्यास म्हण-विणारे भिक्षुक आशाळभूत पणानें आगांतुकीस-जातात त्यांस आंत घेऊन दक्षिणा देण्याचें कारण-काय? कधीं ही देऊं नये म्हणजे असे ब्राह्मण पुनः-कोठें कोणाचे ही दाराशीं बोलाविल्या शिवाय जाणा-र नाहींत पण तसें न करितां त्यांस आंत घेऊन दक्षि-

पादेतात. आणि पाठीमागून ह्मणतात काय हो ब्राह्म-
ण निर्लज्ज हे बोलावण्या शिवाय शालजोड्या खां-
द्यावर उडवीत येऊन उगीच गर्दी केली तर त्यांस
अंत घ्यावें कां आणि मग असें म्हणावें कां? यावरू-
न असें सिद्ध होतें कीं, ही हेलपटे घालण्याची व आ-
गांतुकी करण्याची रीत तुह्मींच घालून दिली आहे,
म्हणून ते करितात व याच योगानें उभयतांस ही अड-
चणी आहेत. तुह्मीं तशी रीत सोडून द्या म्हणजे अर्थी
तच ताळ्यावर येईल मग तुह्मांस व त्यांस सुखावह-
होईल व दोघांचीही प्रतिष्ठा वाढेल. कित्येक भिक्षुकांस
अशीं कामें करण्याची आवड नाहीं परंतु करतात काय?
सर्वांबरोबर त्यांसही तसें करावें लागतें. नाहींतर त्यांस
कांहीं मिळत नाहीं. गरीबीमुळें एकट्याला तसें करण्या-
स सवड होत नाहीं.

**गोपाळपंत**— फार उत्तम आहे शास्त्रीबाबा उ-
द्ईक राममंदिरांत कांहीं कामा साठीं आमची गृहस्थ मं-
डळीची सभा भरणार आहे तेथें हा विषय काढितों परं-
तु त्या प्रसंगीं आपण जर तेथें आलां तर फार उत्तम हो-

ण आपले हातानें आपलें अनहित करून घेतल्या सा-
रखें होतें.

**गोपाळपंत**:- फार उत्तम आहे, आजपासून अ-
संच करीन. इतक्यांत रामशास्त्रीबावांचा विद्यार्थी हातां-
त पुस्तक घेऊन येतो आणि म्हणतो गुरुजी ही पोथी तु-
म्ही आपले जवळ घ्या आणि मी पाठ केलेलें म्हणून दाख-
वितों तें बरोबर आहे किंवा नाहीं ते पहा.

**रामशास्त्री**:- मी सोंवळा आहें आणि पुस्तक
छापलेलें आहे त्यास मी सोंवळ्यानें शिवत नाहीं.

**गोपाळपंत**:- ( हें ऐकून ) छापील पुस्तकांस
सोंवळ्यानें शिवत नाहीं याचें कारण काय ?

**रामशास्त्री**:- अहो या शाईंत बकऱ्याचें किंवा
गुराचें मांदें असतें असें म्हणतात. म्हणून शिवत नाहीं.

**गोपाळपंत**:- महाराज, आतां मात्र लहान तों-
डानें मोठा घांस घेण्याचा प्रसंग आला आहे पण काय करा-
वें? समयविशेषीं घ्यावाही लागतो मला वाटतें याविषयीं
आपल्यास माहीतगारी कमी आहे.

**रामशास्त्री**:- कशी बरें त्यांत चरबीची शाई नसतेक

**गोपाळपंत:-** होय असत्ये खरी पण प्रथम कापी-लिहिण्यासमात्र असते परंतु ती या पोथीवर येत नाहीं. ही पोथीवरची सर्व शाई जवसाचें तेल व काजळ याची असते आणि तें पुस्तक झालें म्हणून त्यास लोक सोंवळ्यांत घेतात तसें पाहिलें तर कागद् चिंध्यांचे असतात ते-सोंवळ्यांत घ्यावे काय? जर ते घ्यावे तर पोथी कां घेऊं-नये. असे गैर माहिती मुळें पुष्कळ ओंवळे पदार्थ सोंवळ्यांत घेण्याचा प्रचार झाला आहे परंतु कित्येक आपल्या सारिखे एखादी गोष्ट करीत नसतील म्हणून गांवभर तर करतात ना?

**रामशास्त्री:-** अहो हिंगा विषयीं मात्र माझे ऐकण्यांत आहे परंतु तो खाण्याची फार दिवसां पासून रूढी पडून गेली आहे मी मात्र खात नाहीं परंतु एकानें न खाल्ला म्हणून त्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**गोपाळपंत:-** तो हिंग सर्वांस माहीत झाला आहे तें एकीकडे राहूं द्या आपले पुढें जो शिसव्याच्या लांकडाचा देव्हारा आहे त्यांत आपण देव ठेविले आहेत आणि सोंवळ्यानीं त्यास शिवतां याच्या कळाशांना रूनारानें

सरस पाजिला आहे तो सरस गुरांचे नरव्यांचा व शिंगाचा होतो तो सोंवळा आहेकाय? तशींच लाख लाविलेलीं मडकीं ज्यांत लोणचीं, मुरांबे वगैरे ठेवितात ती लाख पाहिली तर कानडीं रंगविणारे जे ढोर व चांभार हे लाख घेऊन त्याचा कानडीं रंगविण्या करितां भट्टी लावून रंग काढून घेतात आणि जो त्या लाखेचा बाकुसर होतो तो स्वस्त दरानें विकतात व तो घेऊन कुंभार मडक्यांस लावितात. तसेंच कांसार त्याचे चुडे करितात ते बायकांचे हातांत असतात ते सोंवळे आहेत काय? तसेंच बुधल्यांतील तूप, तेल इत्यादि पदार्थ खाण्यास शुद्ध आहेत आणि मोट किंवा पखाल यांतील पाणी पिण्यास अशुद्ध धरिलें आहे. माझ्यामतें बुधल्यांतील तूप खाण्या पेक्षां पखालींतील पाणी जर ब्राह्मण भरून आणील तर पिण्यास हरकत नाहीं कारण बुधल्याचीं चामडीं हिरवीं असतात तीं मुळींच रंगवीत नाहींत गुरांचीं, मेंढरांचीं वगैरे सर्व जनावरांचीं आंतडीं व चामड्यांचे तुकडे वगैरे मातीचा सांचा करून त्याजवर लिंपितात. नंतर सुकल्यावर आंतील माती कोरून काढि-

तात त्या कातड्यांत चरबी म्हणजे गांदें तसेंच असतें म्हणून ते बुधले कडकडीत रहातात. रंगविलेलें कातडें असलें तर तें कठीण रहाणार नाहीं. शिवाय ते कातड्याचे थरावर थर देतात ते पिठाची खळ करून त्याजवर देतात तेव्हां ते बुधले किती पवित्र आहेत त्यांतील तर चरबी खाण्यांत आल्या सारिखें होतें. मग छापील पुस्तक वाचण्यास काय हरकत आहे? इकडे पूर्वी पासून कागद शाईलावून सोंवळ्यांत घेण्याची चाल पडली आहे, त्याचा हेतू इतकाच कीं, कागद तागाचे होतात आणि तो ताग सोंवळ्यांत घेण्याची काशीकडे वगैरे चाल आहे परंतु त्या कागदास तयार झाल्यावर गव्हांचे सपीटाची खळ करून त्याचें पांजण देतात ते कागद खरकटे नव्हेत काय? तसेंच मुगटे, पीतांबर कोरे असतां सोंवळ्यास नेसतात त्यांस गव्हांचे सपिटाची खळ करून त्याचें पांजण असतें ते खरकटे पीतांबर व मुगटे सोंवळ्यांत नेसावे काय? अलीकडे मुगटे तागाचेच निघाले आणि पुष्कळ लोक ते घेऊन सोंवळ्यास नेसतात तो ताग सोंवळ्यांत जरी धरला तथापि ते मुगटे—

ओंवळे आहेत, ते विलायतेहून तयार होऊन येतात आणि ज्या ठिकाणीं कापसाचे सुताचा कारखाना असतो तेथेंच हे उत्पन्न होतात. त्या तागांत थोडा जरी कापूस संपर्कानें मिसळ झाला तरी ते सर्व सुगटे कापूस मिश्रित झाले यावरून सोंवळ्यास उपयोगीं नाहींत. तैलंगण देशांत तागास सोंवळ्यानीं शिवत नाहींत म्हणूनच त्या देशांत पुस्तकें ताडाचे पानावर खिळ्यानें लिहून तीं सोंवळ्यात घेतात कागदावर मुळींच ते लिहीत नाहींत. कातांत नाचण्याचे पिठाची मिसळ असते तो कात त्या योगानें खरकटा होतो; परंतु खाण्याची चाल पडली आहे. तसेंच कर्नाटक प्रांतीं मोठे मोठे वीर वैष्णव तप्तमुद्रा घेतलेले यांच्या विधवा व ते एकादशीचे उपोषणास मुसलमान लोकांचे घरचे पोहे व धनगरा कडील दहीं घेऊन सपाटून फराळ करितात ते पोंहे कुटणारे यवन लोकांचे घरीं चाकर यवन अगर महार असतात परंतु त्यांच्या त्या चाली दृढ होऊन गेल्या आहेत म्हणून त्या त्यांस प्रशस्त वाटतात. अशीं नाना प्रकारचीं ओंवळीं अविचारानें व गैर माहितीनें पुष्कळ सोंवळ्यांत घुसून गेलीं आहेत.

याचा विचार सांगा मग छापील पुस्तकास शिवूं नये असें ह्मणा.

**रामशास्त्री:-** तुह्मीं म्हणतां हें असेल खरें परंतु गैर माहितीमुळें एक एक वेळ प्रचारांत येऊन गेलें पुढें एकानें पाहून दुसरा करितो अशा या चाली वृद्धिंगत होऊन मिसळून गेल्या आहेत खऱ्या, याचा मूळ शोध नाहीं.

**गोपाळपंत:-** बरें आतां दोन प्रहर झाले भोजनाची वेळ झाली म्हणून जातों नमस्कार.

**रामशास्त्री:-** गोपाळपंत दादा आज तुमचे मुखानें मला बरीच माहितगारी झाली हा एक तुमचे येण्यानें लाभच झाला सूज्ञाचे भाषणापासून इतके लाभ होतात. आतां तुह्मास जेव्हां जेव्हां फुरसत होईल तेव्हां तेव्हां दोन घटिका येत जा.

**गोपाळपंत:-** मारुती पुढें वानरानें किती उड्या माराव्या आपण स्तुती केल्या सारखा मज मध्यें गुण नाहीं. परंतु आपल्या सारिख्यांचे मुखांतून वाईट भाषण यावयाचेंच नाहीं त्या प्रमाणें आपण बोलला परंतु माझी योग्यता तितकी नाहीं असें म्हणून निघून जातो.

पुढें चालू.

## कथा १ ली

## वैद्य व कुणबी या विषयीं

एक ब्राह्मण वैद्यक्रिया जाणता एका गांवास जा ण्यास निघाला. तो वाटेंत एके नदीवर फराळास उतरला तेथें त्याचे अगोदर एक कुणबी शरीरानें चांगला सदृढ असा भाकर खाण्यास बसला होता. इतक्यांत वैद्य बा- वा तेथें आले आणि घोड्यास कळावा घालून चरावयास सोडिलें व आपण स्नानास जाणार तों त्या लवुमिश्रानें दोन भाकरी खाऊन नंतर एक तांब्याभर उदक प्राशन- करून बाकीच्या भाकरी बांधून चालता होणार इत- क्यांत वैद्यबावा त्यास ह्मणतात अरे बाबा, तूं आजसा- यंकाळीं मरशील हें ऐकून तो म्हणाला कां भटजी बावा असें कां म्हणतां मी तुमचें काय केलें ? वैद्य ह्मणाला तूं- माझें कांहीं केलें नाहींस पण तूं मरणार असें मला शा- स्त्राधारानें कळलें म्हणून सांगतों

अजीर्णे भेषजं वारी । जीर्णे वारि बलप्रदम् ॥
भोजने चामृतं वारि । भोजनान्ते विषप्रदम् ॥ १ ॥

अर्थः- अजीर्णावर उदक प्राशन केलें असतां तें औषधरूप होऊन अजीर्णाचा नाश करितें. अन्नपचना नंतर म्हणजे जिरल्यावर पाणी प्यालें असतां तें बलप्रद होतें, भोजन काळीं उदक पान केलें असतां तें अमृता प्रमाणें आरोग्य करितें आणि भोजन झाल्यावर शेवटीं पाणी प्यालें तर तें विषप्रद होतें म्हणजे विषाप्रमाणें होतें असें शास्त्रांत सांगितलें आहे आणि तूं त्या प्रमाणें भाकर खाऊन शेवटीं पाणी प्यालास मध्यंतरीं प्यावयाचें तसें केलें नाहींस म्हणून मरशील. तें ऐकून कुणबी आपले मनांत सभय होत्साता विचार करून म्हणतो आपण फुकट मरून जाऊं म्हणून वैद्य बावास म्हणाला महाराज, यास कांहीं उपाय सांगावा वैद्य बावा म्हणाले याला कांहीं आतां उपाय नाहीं पहिल्यानेंच चुकलास आतां काय पुसतोस! तूं आपले घरीं जाऊन स्वस्थपणें मर. तें ऐकून कुणब्यानें विचार केला कीं, मध्यें पाणी प्यावें तें शेवटीं प्यालों ह्मणून मरणार तर आणखी भाकरी खावी म्हणजे मध्यें पाणी पडेल अशी हिकमत योजून भाकरी मोडून

आणखी दोन रगडल्या नंतर वैद्यास म्हणाला कां भट्‌जी बावा कसें ? वैद्य म्हणाला आतां तुला कांहीं भय नाहीं, बेलाशक हवा तिकडे जा तेव्हां त्याचे अंतःकरणातील भय जाऊन आपले उद्योगास चालता झाला.

## तात्पर्य.

वैद्य विद्वान आणि कुणबी अडाणी परंतु त्यानें आपले अकलेच्या जोरानें हिकमत लढवून कार्य करून घेतलें यास्तव विद्वान जरी झाला तरी त्याजला युक्ती म्हणजे अक्कल पाहिजे नाहींतर नुसती विद्या असून फळ नाहीं.

# कथा २री.

## ग्रामकंटक ब्राह्मणाची.

एक पांथस्थ एका शहराचे पानवठ्यावर येऊन पोंचला तों त्यास त्या शहराचा एक ग्रामकंटक विप्र भेटला त्यास विचारितो.

विप्रास्मिन्नगरे महान्कथयतास्॥

अर्थः- हे ब्राह्मणा, यानगरींत थोर कोण आहे ? विप्र म्हणतो

तालद्रुमाणां गणः

अर्थ- एथें ताड वृक्ष जे आहेत ते सर्वांहून थोर आहेत त्यापेक्षां मोठा याग्रामांत कोणीच नाहीं हें ऐकून पांथस्थ आपले मनांत म्हणतो माझे बोलण्याचा अर्थ हा समजला नाहीं म्हणून पुनः म्हणतो.

को दाता

अर्थ- एथें दाता कोण आहे? ब्राह्मण म्हणतो

रजको ददाति वसनं प्रातर्गृहीत्वा निशि

अर्थ- प्रातः कालीं वस्त्रें घेऊन सायंकालीं देतो असा दाता एक एथें रजक म्हणजे परीट आहे हें ऐकून पुनः पांथस्थ म्हणतो.

को दक्षः

अर्थ- एथें दक्ष कोण आहे? ब्राह्मण म्हणतो.

परदारवित्तहरणे सर्वोऽपि दक्षो जनाः

अर्थ- दुसऱ्याची स्त्री आणि द्रव्य यांचे हरण करण्याविषयीं येथील संपूर्ण लोक दक्ष आहेत. ते समयीं पांथास मोठें आश्चर्य वाटून पुनः त्यास म्हणतो.

कस्माज्जीवसि हे सखे

अर्थ- अशा नगरांत तूं वांचलास कसा तें सांग ब्राह्मण ह्मणतो.

विषकृमिन्यायेन जीवाम्यहं ॥

अर्थ- विषांतील कीटक म्हणजे किडा जसा विषांतच जीवन पावतो त्या प्रमाणे मीहि या शहरांत जीविका करीत आहें. हें ऐकून पांथ नगर प्रवेश न करितां पुढें चालता झाला.

## कथा ३री.

### मूर्ख स्त्रियेची.

एका शहरांत एक गरीब ब्राह्मण रहात होता. त्याचें त्या गरीबीमुळें कुटुंब पोषण उत्तम प्रकारें होत नसे यामुळें त्याची स्त्री एके दिवशीं एकांतीं आपले पतीस म्हणाली कीं, गावांत पुष्कळ लोक मानबर आहेत त्यांच्या कुटुंबाचीं मनुष्यें किती सरवानें आहेत. ते-सारेच का नीतीनें पैसा मिळवून सुखी झाले आहेत ?-कोणी कसाही पैसा मिळवितो. पैसा मिळविण्यास रीत अथवा गैररीत असें कांहीं नाहीं याविषयीं श्लोक आहे.

यस्यार्थस्तस्य मित्राणि यस्यार्थस्त-
स्य बांधवाः ॥ यस्यार्थः स पुमाल्लो-
के यस्यार्थः स च जीवति ॥ १ ॥

अर्थ- ज्याला द्रव्य अनुकूल त्याला मित्र व बांधव ही हितकारक मिळतात व तोच लोकांमध्यें ख्याती पावून जीवन ही पावतो. तस्मात् या जगांत अर्था सारिखी वस्तु श्रेष्ठ दुसरी नाहीं म्हणून मोठे प्रयत्नें करून द्रव्य संपादन करावें म्हणजे सर्व गोष्टी अनुकूल होतील आणि तें लज्जा धरल्यानें मिळत नाहीं याविषयीं शास्त्रांत असें सांगितलें आहे.

धनधान्य प्रयोगेषु विद्यासंग्रहणे षु च ॥
आहारे व्यवहारे च त्यक्त लज्जः सुखी भवेत् १

अर्थ- धन आणि धान्य संपादन करण्याच्या उपाया विषयीं, भोजनांत आणि व्यवहारांत जो लज्जा सोडितो तो सुखी होतो म्हणून तुम्हास सांगतों कीं, आपल्यास धन नाहीं म्हणून हाल होतात तें द्रव्य कोणते ही उपायें करून संपादन करावें तें एकदांच मिळतें असें नाहीं.

जलबिंदुनिपातेन क्रमशः पूर्यते घटः ॥

स हेतुः सर्वविद्यानां धर्मस्यच धनस्यच ॥१

**अर्थ.**– एक एक बिंदुपातें करून अनुक्रमें घट पूर्ण होतो, सकल विद्या, धर्म तसेंच धन हीं पूर्ण होण्यास तोच अनुक्रम आहे. जशी पाण्याचे थेंबा थेंबानें घागर भरते त्याप्रमाणें क्षणोक्षणीं विद्याभ्यास केल्यानें ती पूर्ण होते. तसाच थोडा थोडा धर्म केल्यानें तोही वृद्धि पावतो, तसेंच थोडें थोडें धन संपादन केलें असतां तें वृद्धिंगत पावून संग्रहास पुष्कळ होतें व अशी एक व्यवहारांत म्हण आहे कीं, " थेंबें थेंबें तळें सांचतें व-खडे खडे डोकें फुटतें " म्हणून असें केल्यानें चरितार्थ उत्तम प्रकारें चालेल यास्तव द्रव्य संपादन होईल-तो उपाय प्रथम करा. हें ऐकून ब्राह्मण ह्मणाला हे-स्त्रिये मला वाटतें तूं पटनमूर्ख आहेस शास्त्रांत सांगितलें आहे.

नाहारं चिंतयेत्प्राज्ञो धर्ममेकं हि चिंतयेत्॥ आहारो हि मनुष्याणां जन्मना सह जायते ॥१॥

**अर्थ.**– बुद्धिमंतानें आपणास आहार कसा प्राप्त हो-

ईल याची चिंता करूंनये. परंतु मला ईश्वरानें मनुष्यज-
न्मास घातलें आहे यास्तव ईश्वरास संतुष्ट करणारा जो
धर्म त्याचें संपादन कसें होईल याचेंच चिंतन निरंतर क-
रावें कारण मनुष्याचा जो आहार तो त्याच्या जन्म काळींच
बरोबर उत्पन्न होतो म्हणून त्याची चिंता वाहणें हें केव-
ळ अज्ञान आहे म्हणून तुला सांगतों कीं, द्रव्य अथवा
दारिद्र्य जसें ईश्वर इच्छेनें घडेल त्यांत सुख मानून आ-
नंदानें काल क्रमणा करावी. दुसऱ्याचें द्रव्य पाहून त्याचा
हेवा केल्यानें आपल्यास प्राप्त होतें असें नाहीं. स्त्री म्ह-
णाली आपली आज्ञा प्रमाण परंतु लोकांच्या स्त्रिया चा-
तुर्मासांत कोणी कांहीं कोणी कांहीं नेम धर्म करितात त्यां-
चे घरीं गेलें म्हणजे मला विचारितात कीं, तूं काय नेम ध-
र्म केलास ते वेळेस मला खालीं पाहावें लागतें कारण-
आपले जवळ द्रव्य नाहीं हें ऐकून ब्राह्मण म्हणाला ई-
श्वरानें सर्वच प्राणी द्रव्यवान् उत्पन्न केले नाहींत म्ह-
णून त्यानें त्यां करितां वेगळे वेगळे धर्म ही निर्माण के-
ले आहेत. ज्याला जे घडतील ते त्यानें करावे गरीबीचे
धर्म गरीबांस पुष्कळ आहेत. नेम धर्मास द्रव्यच लाग-

नें असें नाहीं. कोणी द्रव्यद्वारा कोणी शरीर द्वारा ई-
श्वरास संतुष्ट करून अंतीं उत्तम गतीस पात्र व्हावें हा-
च मुख्यत्वें करून मनुष्यांचा धर्म आहे. त्या प्रमाणें तु-
ला पाहिजे तर तूंही एखादा नियम कर तो असा कीं,
नित्यशः मौनें करून भोजन कर. त्या विषयीं शास्त्रां-
त असें सांगितलें आहे.

यस्तु संवत्सरं पूर्णं नित्यं मौनेन भुं-
जति ॥ युगकोटिसहस्त्रं तु स्वर्गलो-
के महीयते ॥ १ ॥

अर्थः- जो मनुष्य समग्र एकवर्ष पर्यंत नित्य मौनें-
करून भोजन करितो तो सहस्त्र कोटी युगें पर्यंत स्व-
र्गलोकीं सत्कार पावतो देव त्याची पूजा करितात हा
नेम फार चांगला आहे. एक संवत्सराचें इतकें फळ आ-
हे मग हाच नेम निरंतर घडल्यास फारच उत्तम होईल
हें श्रवण करून स्त्री समाधान पावली आणि पतिआ-
ज्ञे प्रमाणें वर्तणूक करिती झाली.

## कथा ४थी.

## जारिणी स्त्रीची.

एका ठिकाणीं मार्गावर कोणी समर्थानें पाणपोई म्हणजे उदक सत्र ठेविलें होतें त्याचे सन्निध एक तरुण स्त्री मोठे नखऱ्यानें उभी होती तिचे सौंदर्यास मोहित होऊन एका पांथस्थानें प्रश्नकेला कीं, **कस्येयंतरुणि प्रपा॥** हे तरुणि, ही पोई कोणाची आहे? तिणे उत्तर दिलें. **पथिक नः** पुनः त्यानें विचारिलें **किंपीयते ऽस्याम्** ती उत्तर करते. **पयः** एथें पाणी पितात हें ऐकून तो पुनः प्रश्न करिता झाला. **धेनूनामथ माहिषम्**- पय म्हणजे दुधास नांव आहे म्हणून पुसतो गाईचें किंवा म्हशीचें? तरुण स्त्री मनांत समजली कीं, हा समजला नाहीं म्हणून पुनः उत्तर देत्ये.— **बधिर रे वारः** हे बहिऱ्या एथें वारःम्हणजे पाणी पितात. तें ऐकून पांथ म्हणतो **कथं मंगलः सोमो वा थ शनैश्चरः** काय म्हणतेस! मला समजत नाहीं एथें काय वार पितात? कोणते त मंगळवार किंवा सोमवार अथवा शनवार कोणते वार पितात हें-

१ पानीय शालिका.

श्रवण करून पुनः ती त्यास सांगत्ये. अमृत मिदं ए-
थें अमृत ह्मणजे उदक पान करितात. पुनः पांथ विचा-
रितो. तत्ते ऽधरे दृश्यते तें अमृत तर तुझे अधरो-
ष्ठाचे ठायीं दिसत आहे ते समयीं तरुणी आपले मनां-
त समजली कीं, हा लबाड आहे, तोही तशीच होती म्ह-
णून त्यास म्हणत्ये. श्रीमत् पांथ विलास सुंदर -
सखे यद्रोचते तत्पिब ॥१॥ हे विलासी पांथा तें व
हें दोन्हीं ही अमृतेंच आहेत तें पाहिजे तर तें पी, हें पा-
हिजे तर हें पी हें श्रवण करून स्त्रीसाध्य आहे असें-
समजून तो सुकाळ्यानें निघून गेला.

## कथा ५ वी

## अंतर्लापिका

एके दिवशीं भोजराजा सभास्थानीं येऊन पं-
डितांस प्रश्न करिता झाला - ( कुंती सुतो रावण कुं-
भ कर्णः ) हें ऐकून एकही सभासद उत्तर देईना शे-
वटीं कालिदास म्हणतात.

का पांडुकांता, गृहभूषणं किं, को राम-

शत्रुः, किमगस्त्यजन्म॥ कः सूर्यपुत्रो,
विपरीतपृच्छा कुंती सुतो रावण कुं-
भ कर्णः ॥१॥

(या श्लोकाचे तीन चरण प्रश्न आणि चवथा चर-
ण त्याचीं उत्तरें आहेत यास अंतर्लापिका असें म्हणतात.)
अर्थ- प्रश्न. का पांडुकांता म्हणजे पांडु राजाची स्त्री-
कोण? उत्तर, कुंती. प्रश्नः गृहभूषणं किं? म्हणजे घ-
रास भूषण काय? उत्तर. सुतो म्हणजे बालक. प्रश्नः
को रामशत्रुः - म्हणजे रामाचा शत्रू कोण? उत्तर: राव-
णः म्हणजे रावण. प्रश्नः किमुगस्त्य जन्मः म्हणजे अ-
गस्त्य ऋषीचा जन्म कोणापासून झाला? उत्तर- कुंभः
म्हणजे कुंभापासून. प्रश्नः कः सूर्य पुत्रो म्हणजे सू-
र्याचा पुत्र कोण? उत्तरः कर्णः म्हणजे कर्ण. या प्रकारें-
करून राजास संतुष्ट करिता झाला. दुसरे दिवशीं पुनः -
राजानें प्रश्न केला- गौरी मुखं चुंबति वासुदेवः हीअं-
तर्लापिका आहे याची समस्या पूर्ण करावी तें ऐकून का-
लिदासानें श्लोक म्हटला-

का शंभुकांता किमु नेत्ररम्यं शक्राभकः

किं कुरुते फलानी ॥ मोक्षस्य दाता स्म-
रणेन को वा गौरी मुखं चुंबति वासुदेवः ॥१॥
(पहिल्याप्रमाणें तीन चरण प्रश्न व चवथा चरण उत्तर.)
अर्थः- शंभूची स्त्री कोण? गौरी. काय पाहून नेत्र रमम
ण होतात? मुख. शुक म्हणजे पक्षी यांचीं बालकें फला
ला काय करितात? उत्तर चुंबन करितात. स्मरणें करून
मोक्ष देणारा असा दाता कोण? वासुदेव (भगवान्) य
प्रमाणें श्रवण करून भोजराजा समाधान पावला. पु
दुसरे दिवशीं सभेंत येऊन राजानें प्रश्न केला. संध्य
वंदन माचरंति विबुधा नारी भगांतर्जलेः या
प्रमाणें ऐकून कालिदास उत्तर देतात.

किं कुर्वंत्युषसि द्विजाः प्रतिदिनं के मान-
नीयाः प्रभोः। का वा साहसिकी निशासु
सततं द्यौः कीदृशी वर्तते ॥ कुत्रास्ते म-
धु नारिके रजफले कैः स्यात्पिपासा श-
मः। संध्यावंदन माचरंति विबुधा नारी
भगांतर्जलैः ॥१॥
अर्थः- प्रति दिवशीं उषःकालीं ब्राह्मण काय करिता

न? उत्तर- संध्यावंदनकरितात. ईश्वरास मान्य असा-कोण? विबुध (पंडित). साहस कर्म करणारी कोण? ती (स्त्री). रात्रीचे ठायीं आकाश कसें दिसतें? भगः म्हणजे जीं नक्षत्रें आहेत तीं चाळणीचे भोंका प्रमाणें भगाकार दिसतात. नारळा मध्यें मधु म्हणजे गोड पाणी कोठें असतें? अंतः म्हणजे आंत असतें. ताह्यान कशानें शांत होते? जलैः म्हणजे उदकानें. याप्रमाणें श्रवण-करून भोजराजानें सभेमध्यें कालिदासाची फार स्तुती करून अंतःपुरांत गमन करिता झाला.

दुसरे दिवशीं भोजराजा सभास्थानीं प्राप्त होऊन संपूर्ण पंडितांस प्रश्न करिता झाला.

गौरी मुखं चुंबति वासुदेवः

कोणी उत्तर देत नाहीं असें पाहून कालिदास म्हणतात राजा श्रवण कर.

का लोकमाता किमु देहमुख्यं रतेः किमादौ कुरुते मनुष्यः॥ को दैत्य हंता वद वेक्रमेण गौरी मुखं चुंबति वासुदेवः॥१॥

अर्थ- संपूर्ण जनाची माता कोण? (गौरी) शरीराम-

ध्यें मुख्य अवयव कोणता ? ( मुखं ) विषय काळीं प्रथम काय करितात ? ( चुंबति ) दैत्यांस मारणारा कोण ? ( वासुदेवः ) हे सारे क्रमें करून सांग ? ( गोरीमुखं चुंबति वासुदेवः ) या प्रमाणें श्रवण करून राजा ह्मणाला ह्या माझ्या सभेमध्ये कालिदास केवळ एक रत्नच आहे असें म्हणून कालिदासास मोठा मान देता झाला.

नंतर भोजराजा म्हणाला.

सिंदूरबिंदुर्विधवा ललाटे ॥

कालिदास म्हणतात राजराजा श्रवण कर.

करोति शोभामलके स्त्रियाः को । दृश्या न कांता विधिना च कोक्ता ॥ अंगे तु कस्मिन् दहनः पुरारेः । सिंदूर बिंदुर्विधवा ललाटे ॥ १ ॥

अर्थः- स्त्रियांचे केंशास शोभा देणारा असा कोण ? ( सिंदूरबिंदुः ) पहाण्यास योग्य नाहीं अशी स्त्री कोणती ( विधवा ) शंकराचे शरीर भागांत कोणत्या ठिकाणीं अग्नि आहे ( ललाटे ) म्हणून ( सिंदूर बिंदुर्विधवाललाटे ) याप्रमाणें श्रवण करून भोजराजा अंतःकरणांत समाधान पावता झाला.

## कथा ६ वी.

## आकाबाईची.

एक ब्राह्मण दरिद्रतापानें पीडा पावल्यामुळें विचार करिता झाला कीं, आतां आपले हातून कुटुंबाचा योग क्षेम चालत नाहीं त्यापेक्षां कोठें तपश्चर्येस बसून ईश्वर प्राप्ती होईल तो यत्न करावा म्हणून उठोन एका महादेवाचे देवालयांत जाऊन बसला. त्यानें घरास यावें व प्रपंच चालवावा म्हणून त्याचे स्त्रीनें व मुलांनीं पुष्कळ यत्न केले परंतु ब्राह्मणाचे मनाचा निग्रह झाल्यामुळें तो त्यांचा उपाय व्यर्थ गेला. नंतर कुटुंबाचीं सर्व मनुष्यें उपाशीं मरूं लागलीं ते वेळेस ज्यास जी युक्ति सुचली ती लढवून उदर पूर्ती करूं लागले. इकडे ब्राह्मण बहून दिवस तपश्चर्या करीत असतां ईश्वर प्रसन्न तेनें चिंतामणी प्राप्त झाला. तदनंतर ब्राह्मण उठोन घरीं आला. आणि उत्तम प्रकारें करून कुटुंब पोषण करिता झाला. अपार द्रव्यप्राप्ती झाल्यामुळें पुष्कळ पैसा खर्च करून मोठी एक हवेली बांधिली या मुळें गांवांतील कित्येक हव्यासी म्हणजे हेवा करणारे लोकांचे मनांत आलें कीं, या ब्रा-

ह्मणास ईश्वर प्रसन्न होऊन अपार द्रव्य दिलें आपण
जर तशी तेथें तपश्चर्या केली तर आपणास ही अशी सं
पत्ती प्राप्त होईल या आशेनें त्या देवालयांत जाऊन तप-
श्चर्येस बसते झाले कित्येक दिवसांनीं असें झालें कीं,-
त्या देवालयांत तपस्व्यांस बसावयास जागा मिळेना अ-
शी त्या देवाची कीर्ती जिकडे तिकडे पसरल्या मुळें लांब-
लांबचे लोक तपश्चर्येस येऊन बसले. एके दिवशीं दुस
रा एक ब्राह्मण कुटुंब वत्सल दरिद्रानें गांजला म्हणून
घर दार सोडून देशपर्यटन करीत असतां या देवाची की-
र्ती ऐकून तेथें गेला आणि जेथें जागा रिकामी होती तेथें
आसन घालून तपश्चर्येस बसला इतक्यांत त्या जाग्याव-
र बसणारा तपस्वी कोठें बाहेर गेला होता तो आला आणि
त्यानें या ब्राह्मणास धुडकावून हांकून दिलें आणि आपण
आपले जाग्यावर आसन घालून बसता झाला. ब्राह्म-
ण इकडे तिकडे बसावयास जागा पाहूं लागला परंतु को-
ठें तपस्व्या शिवाय रिकामी जागाच आढळेना म्हणून दे-
वालयाचे बाहेर आला तों तेथें ही तपस्वी बसले आहेत-
तेव्हां निरुपाय होऊन तेथें जवळच एक आकाबाईचें दे-

ऊळ होतें तें रिकामेंच होतें तेथें कोण वसतो त्यानें ती जा-
गा निवांत आहे असें पाहून आसन मांडून तेथें जाऊन ब-
सला दोन दिवस तपश्चर्या झाली तों आका बाईनें आप-
लें प्रत्यक्ष स्वरूप दाखवून प्रसन्न झाली ते समयीं हा ब्रा-
ह्मण तिचें तें विचित्र स्वरूप म्हणजे चिंध्या नेसावयास,-
हातांत लांकडाचे मणी, भिक्षापात्र, हस्तांत गर्या नरोटी,
तोही धड नाहीं तिला तीन भोंकें, एके हातांत चूड, डोकी-
वर मनुष्याचे मस्तकाची करटी, गळ्यांत बिबे व कवड्यां-
चें हार, पायांत बेडी सबळ लोखंडाची मुखास शेंदूर अ-
सें तें विलक्षण ध्यान पाहून ब्राह्मण अगदीं गांगरून ग-
ला तंतर तसाच धैर्य धरून हळूच मोठे नम्र पणानें ति-
ला विचारिलें मातृश्री तुझें नांव काय! ते समयीं आका-
बाई म्हणाली अरे तूं मला अद्यापि ओळखत नाहींस-
माझी तुजवर निरंतर पूर्णकृपा असतां तूं मला विसर-
लास काय? मी लक्ष्मीची वडील बहीण मला आका बा-
ई म्हणतात. ज्या ठिकाणीं मी वास करित्यें त्या जागीं ती
ढुंकून सुद्धां पहात नाहीं आणि ती जेथें असते तेथें मी-
ही अवलोकन करीत नाहीं असें आह्मा उभयतां बहिणी

बहिणींत वैमनस्य आहे तुझी निर्वाणभक्ति पाहून तुला प्रसन्न झाल्यें जें पाहिजे तें माग द्यावयास सिद्ध आहें, परंतु फक्त सुखसंपत्ती मात्र मज पाशीं नाहीं त्यावेगळें जें मागशील तें देण्यास सिद्ध आहें. ब्राह्मणानें विचार केला कीं, ज्या दत्तास भिऊन पळून आलों ती आकाबाई पाठीशीं उभीच आहे. झाले तितके हाल काय थोडे झाले, आतां प्रसन्न होऊन आणखी काय विपत्ती करणार कोणाजाणे? थोडे वेळानें विचार करून मनांत ह्मणाला अशा या आकाबाई पासून जर सुख संपदा संपादन झाली तर विषघटांत अमृत सांपडल्या प्रमाणें होईल. मगविचार केला कीं, आकाबाईने बोलण्यांत आलें आहे कीं, जेथें लक्ष्मी असते तेथें मी रहात नाहीं व जेथें मी रहातें तेथें ती येत नाहीं. ही गोष्ट खरी कारण आपले घरीं सर्वकाळ आकाबाई वास करीत आहे म्हणून आपले हाल. ती आपले घरींहून गेल्यावर मग लक्ष्मी आपोआप न बोलविनां येईल असें मनांत आणून मोठे आनंदानें आकाबाईनें स्तवन केलें आणि म्हणाला मातृश्री आपण जर मजला प्रसन्न आहां तर आजपासू-

न मजकडे अथवा माझे कुळाकडे आपलें दर्शन ही न-
सावें एवढें मागतों ते समयीं आकाबाई वचन बद्ध झा-
ली होती यामुळें तिला ती गोष्ट मान्य करणें प्राप्त झाली.
ते समयीं ब्राह्मणास म्हणाली फार उत्तम आहे. आज-
पासून मी तुजकडे अथवा तुझे वंशाकडे अवलोकन-
ही करणार नाहीं. तूं इतके दिवस माझे सहवासानें गांज-
लास म्हणून मीही तुजवर दया करून मागितलेली दे-
णगी दिली. आतां उद्यां सायंकाळीं तुझे घरांत ती माझी
दुष्ट बहीण लक्ष्मी येईल परंतु ती फार चंचल आहे या-
स्तव तूं असें कर कीं, अस्तमानीं ती तुझे घरांत हस्ताचे
ठायीं पंचारती घेऊन मोठे उद्धट पणानें व गर्वानें येई-
ल ते वेळेस तूं दरवाजा पाशीं हातांत सोटा घेऊन टपत
बैस आणि ती येतांच तिचे पाठींत तो सोटा मार आणि म्ह-
ण कीं. असें उद्धटपणानें तुला येण्यास कोणी सांगितलें
होतें लौकरतेनें पाहिजे तर रहा नाहीं पेक्षां निघोन जा. म्ह-
णजे तिला भय वाटून ती तुझे घरांतून हालणार नाहीं.
मग माझा रिघाव कोठून होतो. असें सांगून आकाबाई-
अदृश्य झाली. नंतर ब्राह्मण तेथून उठोन घरीं आला.

दुसरे दिवशीं सायंकाळीं आकाबाईनें सांगितल्या प्रमा-
णें सोंटा बगलेस मारून तिची मार्गप्रतीक्षा करीत बसला
तों सांगितल्या प्रमाणें लक्ष्मीबाई प्राप्त झाली, तों तिचें तें
तेज पाहून ब्राह्मण अगदीं दिपून गेला; परंतु आकाबा-
ईचे सांगण्यावरून मोठे धैर्यानें तिचे पाठींत सोंटा घात-
ला तों तत्काळ ती अगदीं लवून मर्यादपणें ब्राह्मणाचे
घरांत गेली. त्या दिवसा पासून हाही ब्राह्मण धनाढ्य झा
ला, तदनंतर त्यानें ही एक मोठी हवेली बांधली तेसम-
यीं लोकांस मोठें आश्चर्य वाटून त्या देवालयांतील तप-
स्वी त्यास विचारूं लागले तेसमयीं ब्राह्मण कपटानें म्ह-
णाला मजला आकाबाईनें प्रसन्न होऊन तिनें ही सारी
दौलत दिली. आतां मजला कांहीं कमी नाहीं सर्व गोष्टी
अनुकूल आहेत. हें ऐकून दुसरे दिवशीं सर्व तपस्वी-
महादेवाचें देवालय सोडून आकाबाईचे देवालयांत घु
सले दोन तीन दिवस झाले तों आकाबाई एकेकास प्र-
सन्न झाली आणि वरमाग म्हणाली ते समयीं ते म्ह-
णाले मातृश्री आपली कृपा निरंतर आह्मांवर असावी
तें ऐकून आकाबाई म्हणाली हे भक्त हो माझी तुह्माव

रव काय परंतु तुमचे वंशावर ही निरंतर रूपा राहील कांहीं चिंता करूंनये. असें आकाबाईचें भाषण श्रवण करून सर्व तपस्वी उठून दुसरे दिवशीं आप आपले घरीं निघून गेले पुढें आकाबाईचा एक एक भक्तावर जेव्हां प्रसाद होऊं लागला तेव्हां काय पहावयाचें आहे. कोणी म्हणतो माझें घर जळालें, कोणी म्हणतो माझी स्त्री जारा बरोबर निघून गेली, कोणी म्हणतो माझें पोर मेलें, कोणी म्हणतात माझा बैल मेला. अशी अवस्था होऊन गेली.

तात्पर्य.

एकाचें पाहून दुसरा करितो अशी लोकांत रीत पडून गेली आहे परंतु एकास उत्तम फल प्राप्त झालें तर दुसऱ्यास तसेंच निश्चयें करून होईल असें नाहीं कारण त्याचे फलप्राप्तीस जीं जीं कारणें घडलीं तीं दुसऱ्याचे हातून घडून येतात असें नाहीं. मागणें जरी झालें तरी त्यास चातुर्य पाहिजे नाही तर एकास तीन वर प्राप्त झाले असून ते व्यर्थ गमविले असें होईल ते कोणते म्हणाल तर सांगतों.

एक गृहस्थ तपश्चर्येस गेला त्यास देवी प्रसन्न

होऊन तिनें तीन वर दिले. नंतर तो गृहस्थ उठून घरीं आला आणि वराची प्रचीति पहाण्याकरितां देवीचें ध्यान करून म्हणाला मातृश्री माझी स्त्री अतिरूपवती होऊं दे असें म्हणतांच तात्काळ ती रंभेसारिखी झाली ही गोष्ट राजास कळली ते समयीं राजानें पालखी पाठवून जबरदस्तीनें तिला घेऊन गेला. ते समयीं ब्राह्मण विचार करितो कीं. मी केलें हें चांगलें नाहीं कारणः—

अतिरूपेण वै सीता अतिगर्वेण रावणः॥ अतिदानं बलिर्दत्वा अति सर्वत्र वर्जयेत् ॥१॥

अर्थ— अतिरूपानें सीता, अति गर्वानें रावण, अतिदानानें बलि असे नाश पावले म्हणून कोणतेंही अति कर्म करूं नये. केलें असतां नाश पावतें पहा एवढा षड्गुणैश्वर्य संपन्न रामचंद्र त्याची स्त्री अति रूपवती होती म्हणून तिला रावणानें नेली. मग माझा यः कश्चितांचा पाड काय. आतां राजानें स्त्री नेली तेव्हां फिर्याद करण्यास ही जागा राहिली नाहीं पुढें विचार कसा करावा म्हणून विवंचना करीत बसला उगीच बसावें तर स्त्री भ्रष्ट

होऊन आपले कुलास बट्टा लागतो तस्मात् उपाय करा-
वा असा विचार करून विनंती करिता झाला कीं, माझी-
स्त्री राजानें जबरदस्तीनें हरण करून नेली आहे ती ते-
थें जातांच आस्वली होऊंदे त्या प्रमाणें ती राजा जवळ
जातांच आस्वली झाली आणि चवताळून राजाचे आं-
गावर आली ते समयीं राजा म्हणाला अरे ही आस्वली.
येथें कशास आणिली ही जेथील तेथें नेऊन सोडा तेव्हां
सेवकांनीं ती आस्वली आणून या गृहस्थाचे घरांत सो-
डिली ती येऊन तिणें या गृहस्थाचे बुरे हाल केले ते सम-
यीं पुनः देवीची प्रार्थना करून म्हणाला माझी स्त्री जशी
होती तशीच पूर्ववत होऊंदे तेव्हां पुनः पूर्ववत झाली.
तस्मात् वर मागणें तरी मोठें अकलेचें काम आहे ज्यास
अक्कल नाहीं त्यास कोणतेही उपायानें सुख होत नाहीं.
यास्तव सारासार विचार पाहिल्या खेरीज दुसऱ्याचें पा-
हून हावरेपणानें तसें आपण करूं इच्छितात ते केवळ त-
र पशूच होत फक्त त्यांस शृंगें आणि पुच्छ नसतें बाकी-
अवयव बरोबरच असतात.

# कथा ७वी

## आचारभ्रष्ट संन्याशाची व याच-
## काची.

एके दिवशीं गुरु शिष्य कांहीं बोलत बसले होते इतक्यांत एक यती मार्गानें तांबूल भक्षण करीत चालला होता त्यास पाहून शिष्य म्हणाला गुरुजी हा यती एवढे उन्हांतून कोठें जात आहे मला वाटतें त्यास आजपु डी (भोजन) मिळाली नाहीं म्हणून कोठें तरी जात आहे आपले घरीं त्यास बोलवावें हें ऐकून गुरूनें उत्तर दिले यतीस पाहून माझे ही मनांत तसेंच आलें परंतु तो आ पले धर्मानें रहात नाही यामुळें त्याचे दोष दुसऱ्यास घ डतात शास्त्रांत असें सांगितलें आहे.

यतिश्च ब्रह्मचारी च विधवा च रज-
स्वला॥ तांबूल चर्वणं दृष्ट्वा सचैलं
स्नानमाचरेत् ॥१॥

अर्थ:- यती म्हणजे सन्याशी तसाच ब्रह्मचारी, रज- स्वला म्हणजे विटाळशी या त्रिवर्गास तांबूल वर्ज आहे

फारकाय पण यांहीं तांबूल भक्षण केला असें कोणाचे दृष्टीस पडलें असतां पाहणारानें सवस्त्र स्नान करावें. न केल्यास त्याजला दोष घडतो यावरून पहाकीं, त्या-त्रिवर्गांस किती दोष घडत असेल तो? असें असतां हा-यती तांबूल खात मार्गानें पाय पोळत जात आहे यास आपण पाहिलें म्हणून आतां स्नान केलें पाहिजे, असले यतीस भोजन घालणें हें कर्म तर फारच कठीण आहे. म्हणून मी बोलाविलें नाहीं. शिष्य म्हणाला तर मग हा वेषधारी असावा. गुरू म्हणाला वेषधारी तर नाहीं. या-नें चतुर्थाश्रम घेतला आहे खरा परंतु कर्मभ्रष्ट आहे याचे दुराचरणानें आपण बुडून लोकांस बुडविणारा असा हा अधमाधम आहे याचें भगवें वस्त्र पाहून उ-पयोग नाहीं. जो आपले धर्मा प्रमाणें नीतीनें रहातो तो त्या त्या आश्रमीं शोभा पावतो तोच त्याणें आपली-यथार्थ क्रिया सोडिली म्हणून भ्रष्ट जाणावा या अ-शा भगवे वेषानें स्वर्गप्राप्ती होत नाहीं तर स्वर्ग प्रा-प्तीस जें कांहीं मुख्यत्वें करून पाहिजे तें संपादन न-करितां पोटभरण्यास्तव भगवीं वस्त्रें धारण करिता-

न कोणी जटा वाढविनात, कोणी आंगास राखलाविना-
न परंतु शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं,

> यस्य चित्तं द्रवीभूतं कृपया सर्वजं-
> तुषु ॥ तस्य ज्ञानेन मोक्षेण किं ज-
> टाभस्मलेपने ॥१॥

अर्थ- ज्यानें चित्त कृपेनें सर्व प्राणिमात्राचे ठायीं द्र-
व युक्त आहे त्याला ज्ञानेंकरून किंवा मोक्षें करून अथ-
वा जटाधारणें करून काय होणार त्यास कांहींच उपयो-
ग नाहीं. स्वकर्मानें आचरण करून सर्वभूतीं दया ज्य-
ची साक्षी राहते तोच पुण्यवान त्याला या भूतलावर
च स्वर्ग आहे साधू व खल हे कसे ओळखावे यांचीं-
थोडीं लक्षणें सांगतों.

> प्रलयेऽभिन्न मर्यादा भवंतिकिंहि
> सागराः॥ सागरा भेद मिच्छंति -
> प्रलयेऽपि न साधवः॥१॥

अर्थ- समुद्र प्रलयकालीं आपली मर्यादा सोडिता-
न व काष्ठ पाषाणादिकांचा भेद मानून एकास तारता-
न व एकास बुडवितात. परंतु साधु जे आहेत ते आपल्य

र कसाही प्रसंग पडला तथापि क्षोभ पावत नाहींत, व-
शत्रुमित्र इत्यादिकांचा भेद जाणत नाहींत. सदासर्वकाळ
आनंदरूपच रहातात. व ते जिकडे जातात तिकडे त्यांस
संपत्तीच प्राप्त होतात.

परोपकरणं येषां जागर्ति हृदये सतां॥
नश्यंति विपदस्तेषां संपदः स्युः पदे पदे॥१

अर्थ- ज्या साधूंच्या हृदयांत निरंतर परोपकार जाग-
तो म्हणजे जे साधू सदासर्वकाळ परोपकार करितात.
त्यांच्या सकल विपत्ती नाशाप्रत पावतात. आणि जिक-
डे जातील तिकडे त्यांस संपत्तीच प्राप्त होतात आतां ख-
ळाधम जे आहेत ते काय पावतात म्हणाशील तर सांगतों.

परस्परस्य मर्माणि ये भाषंते नराधमाः॥
त एव विलयं यांति वल्मीकोदर सर्पवत्॥१

अर्थ- जे पुरुष अधम असतात ते परस्पर एकमेकां-
ची वर्मे लोकांत प्रसिद्धीस आणून ते आपला नाश करू-
न घेतात. जसा वारूळांतील सर्प आंतचे आंत वेष्टित हो-
ऊन मृत्यु पावतो तसेच द्वेष करणारे आपला नाश आप-
णच करितात. हे केवळ भूमिभार आहेत. असें समजावें.

धर्मार्थकाममोक्षाणां यस्यै कोऽपि
न विद्याते ॥ अजागलस्तनस्येव त-
स्य जन्म निरर्थकम् ॥ १ ॥

अर्थ:- धर्म, अर्थ, काम, मोक्ष त्या चार पुरुषार्थी नू-
न एक ही ज्याला घडला नाहीं तो मनुष्य जन्मास येऊ-
न काय कामाचा जसे शेळीच्या गळ्यांत आंचळ अस-
तात त्यांचा कांहीं उपयोग नाहीं तसेच ते पुरुष होत.
ते सहस्त्र वर्षे जरी वांचले तरी ते उपयोगी नाहींत कारण:-

मुहूर्तमपि जीवेत नरः शुक्लेन कर्म-
णा ॥ न कल्पमपि कृष्णेन लोक-
द्वयविरोधिना ॥ १ ॥

अर्थ:- मनुष्य शुद्ध कर्मे करून मुहूर्तमात्र जरी वांच-
ला तरी त्याचें तें जीवन श्रेष्ठ होय आणि लोकद्वयाचा
नाश करणारें जें नीच कर्म तेणें करून कल्प पर्यंत ज-
री वांचला तरी तें त्याचें जीवन व्यर्थ होय.

शिष्य:- गुरुजी आपण सांगितलें तें सर्व खरें
आहे भगवीं वस्त्रें परिधान करून साधूवेषानें फिरण
रें पुष्कळ लोक आहेत. ते सर्वच साधू आहेत असें नाहीं.

जे आचार संपन्न दयाशील तेच साधू वरकड असा-
धू असतां उदर पोषणा निमित्त नाना प्रकारचीं सोंगें
घेऊन फिरतात त्यांस जर साधू मानिले तर आपण
ही त्यांचे साह्य कारी होऊं म्हणजे जर त्यांजकडे त्या
सोंगा निमित्त कांहीं पातकाचा वांटा असेल तर तो
अंशतः आपले कडेस ही येईल. बरें सालमजकुरीं
जिकडे तिकडे पर्जन्य पडोन सुभक्षा चांगली झाली
असें ऐकतों आणि इकडे या दक्षिणेंत मात्र या नगरा-
चे आसपास देखील पाऊस पडत नाहीं याचें कार-
ण मला वाटतें येथें मोठें शहर म्हणून असे पोटभ-
रे पुष्कळ रहातात त्यांच्या योगानें हें कृत्य झालें अ-
सावें.

गुरुजी— नाहींरे वेड्या तें नाहीं परंतु त्याच मासल्या-
चें दुसरें झालें आहे तें असें कीं, सालमजकुरीं या शह-
रांत पर्जन्य पडोन सुभक्षा चांगली व्हावी या आशेनें ये-
थील कित्येक धनवंतांनीं आपला उदार आश्रय दिल्या-
मुळें दोन चार यज्ञ झाले ते सांग झाले नाहींत म्हणून हा
असा येथें प्रलय झाला आहे.

अग्निहोत्रं विना वेदा न च दानं वि-
ना क्रिया॥ न भावेन विना सिद्धि-
स्तस्माद्भावो हि कारणम्॥

अर्थ- अग्निहोत्रा वांचून वेद शिकलेला सफल हो
त नाहीं, अग्निहोत्र घेतल्यावर यज्ञ करणें हें त्यानें मु-
ख्य कर्मच आहे, असें असतां आपण म्हणतां हें कसें शो-
भेल.

गुरुजी- अरे तूं म्हणतोस हें खरें आहे पण तें सां-
ग झालें तर उत्तमच आहे पण तसें झालें नाहीं तर त्या पासू-
न काय होतें तें ऐक.

अन्नहीनो दहेद्राष्ट्रं मंत्रहीनश्च
ऋत्विजम्॥ यजमानं दानहीनो -
नास्तियज्ञसमो रिपुः॥१॥

अर्थ- यज्ञ करावा हें श्रेष्ठ खरें परंतु तो जर अन्न-
दानहीन झाला तर राज्यातें दग्ध करितो, मंत्रहीन झा-
ला तर ऋत्विज म्हणजे ब्राह्मण यांतें जाळितो आणि-
दक्षिणाहीन झाला तर यजमानातें दहन करितो याज-
करितां यज्ञा सारखा दुसरा शत्रु नाहीं यास्तव तो य-

था सांग घडावया जोगें आपल्यास सामर्थ्य असेल तर करावा नाहीं पेक्षां करूं नये. यावरून तूं म्हणतोस तसें ही खरें आहे, यज्ञ करणारांनीं आपले हातून तो यथा-सांग होईल किंवा नाहीं व न झाल्यास त्याचा परिणाम काय होईल हा विचार मुळींच पाहिला नाहीं. फक्त यज्ञ करून दीक्षित बनले. बिचाऱ्या दीन पशूंचा जीव मात्र घेतला. आणि त्या पापाचे प्रायः श्चित्तास कोठेंच ठिका-ण नाहीं. लोकांत मात्र कीर्ति झाली कीं, गोमाजी का-पशानें यज्ञ केला, जवळ पैसा नाहीं यज्ञ करितो असें सांगून मुलखांत भीक मागण्यास रस्ता केला आणि यज्ञाचे कामास कोणीही पैसा देतात. पैसा देणारां-स याचा परिणाम काय होतो हें माहित नाहीं आणि हे गोमाजी कापशे तर यज्ञ निमित्तानें शेंकडों रुपये-मिळवितात. तो यज्ञ यथा सांग करावा तर भिक्षेवर-तितका पैसा मिळत नाहीं. व मिळेल त्यांतील थोडा-खर्च करून बाकी संग्रह करण्याची त्यांची इच्छा अस-ते यामुळें तें कर्म गैरशिस्त होतें यावरून पहा जसे य-ती जटाधारी पोट भरण्या करितां अशीं सोंगें करून

निर्वाह करितात त्या प्रमाणेंच हे यज्ञ केले आहेत यामु-
ळें येथें पर्जन्य पडला नाहीं असें निश्चयें करून मला
वाटतें आतां एथें पर्जन्य पडणार नाहीं असें नाहीं वेळ-
गेल्यावर अवेळीं पुष्कळ पडेल परंतु त्या योगानें ही राजा
व प्रजायांस असुखकारक होईल. पहा त्या इतक्या यज्ञां-
त कोठें दोन हजार चार हजार तरीं ब्राह्मण भोजन झा-
लें काय? मग दक्षिणेचा विचार निराळाच आहे. मला-
वाटतें कीं, दक्षिणा थोडी म्हणून हे याज्ञिक ब्राह्मण मं-
त्र म्हणण्याची त्राटात्राटीच करितात, यामुळें ते सारेच
यज्ञ अन्नदान हीन, दक्षिणा हीन, व मंत्रहीन झाले. -
आतां याचें प्रायश्चित्त सर्वांस थोडें थोडें प्राप्त झालें पा-
हिजे कारण द्रव्य जसें थोडें थोडें पुष्कळांनीं दिलें तसें
एक पर्जन्याधीन सर्व जग आहे, तो वेळेवर पडला ना-
हीं म्हणजे दुसरें शासन नको. तसें येथें झालें आहे या-
विषयीं बंदोबस्त ज्याचा त्यांणीं ठेवावा परंतु तो त्यांचा प-
डला व्यवहार, द्रव्य प्राप्तीकरितां कांहीं तरी सोंगें करून-
लोकांपासून द्रव्य संपादन करितात परंतु ते आपले म-
नांत त्याचें भय बाळगीत नाहींत जसें.

कोंकणांतून एक ब्राह्मण भिक्षुकी करितां देशा वरावर फिरावयास निघाला तो जेथें जाई तेथें सांगे कीं, सालमजकुरीं घर दग्ध झालें त्यांत सर्व हून झालें कांहीं राहिलें नाहीं हें ऐकून दयाळू लोक त्यास चवली पावली देत असत असा तो मुलखांत आठ महिने फिरून पन्नास साठ रुपये जमविले आणि घरीं आला तों खरो खरच घर जळून फस्त झालें आहे मग शंख करूं लागला परंतु त्यानें आपले मनांत विचार केला नाहीं कीं, अग्नीनें आपलें घर भक्षण केलें नसतां लोकांत आपण त्याची निंदा करीत फिरलों वास्तव आपण अग्नीवर उगाच आरोप ठेविला म्हणून त्यास राग येऊन त्यानें आपलें घर भक्षण केलें हें यथार्थ झालें तर जें करणें तें आदि अंत विचार करून केलें असतां आपल्यास व लोकांस हितकारक होतें असें साधूवेष धारण करून सभ्यपणा दाखविणारे याचक कितो लघु गणले आहेत म्हणशील तर सांगतों.

तृणादपि लघुस्तूल स्तूलादपि
च याचकः ॥

अर्थ- तृण हें लघु म्हणजे हलकें याहून कापूस तर फारच हलका त्यापेक्षांही याचक लघु आहे हें - ऐकून शिष्य म्हणतो.

वायुना किं न नीतो ऽसौ

अर्थ- तर मग त्यास वायु म्हणजे वारा कां उडवून नेत नाहीं, कारण याचकापेक्षां ज्यास्त जड पदार्थ कापूस गवत हें वायूवेगानें सहज्जांत उडोन जातात असें - असतां त्यापेक्षां जे हलके याचक ते कां उडोन जात नाहींत? गुरू म्हणतो याचें कारण निराळेंच आहे तें असें.

मामयं याचयिष्यति

अर्थ- हा याचक केवळ लघु मजपाशींही कांहीं मागेल याभीतीनें वायू त्याप्रत अवलोकन ही करीत नाहीं तस्मात् याचना करणें हें मोठें लज्जास्पद असतां ही पुष्कळ निर्लज्ज पणानें तें स्वीकारितात याचें कारण मुख्यत्वें करून दरिद्र होय. परंतु दरिद्राचें कारण काय हें जाणत नाहींत व तें दारिद्र्य कशानें नष्ट होतें याविषयीं शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं,

उद्योगान्नास्ति दारिद्र्यं जपतो ना-

स्ति पातकम् ॥ मौनेन कलहो ना-
स्ति नास्ति जागरतो भयम् ॥ १ ॥

अर्थ- यावरून पाहतां दारिद्य नाशनाचा उपाय उ-
द्योग परंतु यात्वक आपले मनें उद्योग म्हणजे यात्व-
ना समजून तीच करितात शास्त्रात असें आहे कीं,

बाहुवीर्यं बलं राज्ञो ब्राह्मणो ब्र-
ह्मविद्बली ॥ रूपयौवन माधुर्यं
स्त्रीणां तु बलमुत्तमम् ॥ १॥

अर्थ- बाहू पराक्रम हेंच राजाचें बल, ब्राह्मण ब्रह्म-
वेत्ता तोच बलवान्, रूप, तारुण्य व मधुर भाषण या-
लक्षणें करून युक्त जी स्त्री तिचें तेंच बल उत्तम, या-
प्रकारें करून तिघे सर्वांस जिंकतात. तर ब्राह्मण जे ब्र-
ह्म वेत्ते तेच उत्तम त्यांना संकटें व दारिद्र्य कधींच प्रा-
प्त होत नाहीं इतकेंच केवळ नाहीं.

तृणं ब्रह्मविदः स्वर्गो तृणं शूरस्य
जीवितम् ॥ जिताक्षस्य तृणं नारी
निस्पृहस्य तृणं जगत् ॥ १॥

अर्थ- यावरून ब्रह्मवेत्त्यास स्वर्ग तृणा प्रमाणें

वाटतो परंतु जे तसे नाहींत त्यांस दरिद्र तर सोडीत नाहींत परंतु लोकांमध्यें मान्यता ही नाहींशी होत्ये. तेंच जर त्यांनीं आपले स्वधर्मा प्रमाणें नीतीनें आचरण केलें तर दरिद्र प्राप्त व्हावयाचें नाहीं तसें न करितां बोलण्यांत मात्र नीतीच्या गोष्टी सांगतात आणि आचरण तसें करीत नाहींत यामुळें जशी ज्याची क्रिया तसें त्यास फल प्राप्त होतें.

# कथा ८ वी.

## समयसूचक ब्राह्मणाची.

एके दिवशीं भोजराजा आपले सभासदां सह कचेरींत बसला असतां एक ब्राह्मण त्याचे भेटी करितां राज सभेंत आला परंतु त्याला कांहीं खरजेचा उपद्रव झाला होता त्या योगानें त्यास भान न राहतां सभेंत येतांच त्याचे वृषणास पराकाष्ठेचा कंडू उत्पन्न झाला यामुळें त्याणें खाजिवण्यास आरंभ केला तो तसाच वृषण खाजवीत खाजवीत येऊन राजा पुढें उभा राहिला. ते समयीं ती कृती पाहून भोजराजा-

आपले मनांत फारच संतस झाला. ते समयीं तो ब्राह्मण फार विद्वान व धूर्त असल्यामुळें त्या नें राजाची क्रोध मुद्रा ओळखून सावध झाला ते वेळेस त्याजला समजलें कीं, आपण या सभेंत येऊन अयोग्य काम केलें यामुळें राजास क्रोध आला असावा असें जाणून आशीर्वाद करिता झाला.

अंडं कंडूयमानस्य यत् सुखं नर
भूपते ॥ पश्चात् भवति यद्दुःखं तत्
दुःखं तव वैरिणाम् ॥ १ ॥

**अर्थ**- हे राजा वृषणाला कंडू उत्पन्न झाला म्हणजे नखानें खाजविलें असतां जसें सुख प्राप्त होतें त्याप्रकारें तुला निरंतर सुख असो आणि त्यानंतर जी भगभग सुटते म्हणजे आग होते त्या प्रमाणें दुःख तुझ्या वैऱ्यास म्हणजे शत्रूंस निरंतर निरंतर असो याप्रमाणें भोजराजानें श्रवण करून मानसाचे गयीं फार संतोष पावला आणि मनांत म्हणतो ब्राह्मण फार विद्वान-आहे पहा त्यानें आपले विद्येच्या व अकलेच्या कौशल्यानें गोष्ट फिरवून माझें समाधान केलें तरस्मात् हा-

फार विद्वान व सर्वज्ञ दुसऱ्याचें अंतर जाणणारा आहे यास्तव द्रव्य देण्यास हा पात्र आहे असें म्हणून त्यास दहा सहस्र रुपये देऊन संतोषीत केलें.

# कथा ९वी.

## कारकुनाचे कसबाची.

एका बादशाहाकडे कोणी धनवान् गृहस्थानें संधान बांधून देशपांडेपणाची वृत्ती संपादन केली त्या कामीं त्यास पुष्कळ खर्च आला परंतु तो सर्व पैसा बादशाहाकडे नजराणा दिवाणास चंदी जवळचे लोकांस कांहीं पानसुपारी असा मिळोन खर्च झाला. त्या योगानें त्यास एका तालुक्याची वृत्ति मिळाली. ती सनद अशी होती कीं, सरकार वसूली पैकीं शेंकडा दाहा रुपये यानें घ्यावे म्हणून सनदेंत दाहोत्रा द्यावे असें लिहिलें होतें. पुढें सरकारचे शिक्केमोरतब व दिवाणाची मखलाशी वगैरे होऊन सनद बार करण्या करितां कारकुनाकडे गेली ते समयीं त्यास ही आशा उत्पन्न होऊन या गृहस्था जवळ कांहीं

मागूं लागला परंतु त्याची व दिवाणाची ओळख नशांन मूठ भरलेली मग तो या कारकुनास कोठून भीक घालणार कांहीं देत नाहीं म्हणून सांगितलें तेव्हां तो म्हणाला तुमचे सनदे अगोदर चे कागद बार होणें आहेत ते समग्र बार झाले म्हणजे तुमची सनद बार होईल तुह्मीं उदयीक या आज सनद बार होऊन तुमच्या हातीं येणार नाहीं ते समयीं गृहस्थास राग येऊन तत्काळ दिवाणाकडे गेला आणि विनंती केली कीं, मजला मोठे घातः काळीं आपले गांवाकडे जावयाचें आहे आणि आपला कारकून तर सनद बार करून देत नाहीं उद्यां या म्हणतो यास्तव आपण कृपा करून त्यास सांगून आतांचे आतां सनद माझे हातीं येईल असें करावें तें ऐकून दिवाण शरमिंदा होताच त्यानें तत्काल त्या कारकुनास बोलावून खूब तंबी दिली आणि अगोदर ही सनद बार-करून या गृहस्थास दे म्हणून सांगितलें ते समयीं तो बिचारा कारकून काय करितो देणें प्राप्त ते समयीं त्यानें आपले अकलेच्या जोरानें अशी चमत्कारिक युक्ति काढिली कीं, ज्या ठिकाणीं दाहोत्रा म्हणून सनदेंत-

लिहिलें होतें तेथें दा या अक्षरावर एक मात्रा जास्त दि-
ली आणि दोहोत्रा करून त्या प्रमाणेंच सनद बार करू-
न त्या गृहस्थाचे हातीं दिली त्याजला तेथें पुनः ती वा-
चून पाहाण्याचें कारण नाहीं. प्रथम वाचून पाहिली-
होती. तंतर ती सनद घेऊन आपले गांवीं आला आ-
णि कमावीस दाराचे पुढें टाकून दाहोत्रा मागूं लागला
कमावीस दारानें सनद वाचुन पाहिली तों त्यांत दोहो-
त्रा लिहिलें आहे मग त्या गृहस्थास म्हणतो काय-
हो तुह्मी झोंपेंत तर नाहींना ? दोहोत्रा असून दाहोत्रा
मागतां तुमची नजर चुकली असें मला वाटतें ते सम-
यीं गृहस्थ सनद पाहातो तों दोहोत्रा लिहिलें आहे
खरें तेव्हां मनांत समजला कीं, हें कर्म बारनिशी क-
रणारानें केलें आहे काय चिंता आहे आतां जाऊन त्या-
चे दांत पाडून टाकितों असें म्हणून मोठे तोऱ्यानें कार-
कुना जवळ आला आणि त्यास फार रागें भरला ते स-
मयीं कारकुनास परिणाम माहितच होता म्हणून म्ह-
णाला महाराज मी कांहीं तुमचा शरमिंदा नाहीं या-
स्तव मला बोलण्याचें कारण नाहीं आपण बादशाह्य

कडे जाऊन ही गोष्ट कळवावी कारण ज्याणीं तुह्मा पासून द्रव्य घेतलें असेल ते ही सनद आतां तुह्मांस दाहोत्याची करून देतील ते समयीं त्यास अधीकच राग आला आणि दिवाणा कडे जाऊन सर्व हकीकत सांगितली परंतु एक-वेळ पदरीं पडल्यावर मग ओळख कोठची. दिवाणानें सां-गितलें ठीक आहे मी सरकारच्या कानावर घालतों मग-जसा हुकूम होईल त्या प्रमाणें करूं. नंतर गृहस्थ कित्ये-क दिवस हेलपटे घालून दमला, दिवाणाची भेट ही दुर्ल-भ झाली. मग कामाचा विचार कोठचा याविषयीं उदा०.

निर्धनं पुरुषं वेश्या प्रजा भग्नं नृ-
पं त्यजेत्॥ खगा वीतफलं वृक्षं भु-
क्त्वाचाभ्यागता गृहम्॥१॥

**अर्थ**- द्रव्य हीन पुरुषास वेश्या त्यागित्ये, पालनादि-शक्तिहीन अशा राजास प्रजा सोडिते, फलहीन वृक्षा-स पक्षी सोडितात, ज्याघरीं भोजन केलें त्याचा त्याग करून अभ्यागत जातात.

गृहीत्वा दक्षिणां विप्रा स्त्यजंति य-
जमानकम्॥ प्राप्तविद्या गुरुं शिष्या

दग्धारण्यं मृगास्तथा ॥१॥

**अर्थ:-** ऋत्विज ब्राह्मण दक्षिणा घेऊन यजमानानें सोडितात, शिष्य विद्या प्राप्त झाली म्हणजे गुरूतें सोडून जातात, दग्धवन सोडून मृग अन्यत्र कोठें ही जातात, या दोन श्लोकांचें तात्पर्य ज्यापासून जें आपल्यास मिळावयाचें तें मिळे पर्यंत त्याचे आज्ञेंत असतात आणि मिळाल्यावर त्याचा त्याग करून जातात. त्या प्रमाणें या गृहस्था पासून जें द्रव्य मिळावयाचें तें मिळालें आतां कारभारी, दिवाण अथवा बादशाहा यांतून यास कोण विचारतो हे लपरें घालतां घालतां एके दिवशीं दिवाणानें सांगितलें आज तुह्मीं दरबारास या म्हणजे सरकारचे कानावर घालितों त्या प्रमाणें बादशाहाचे दरबारास गेला ते समयीं दिवाणानेंही मजकूर बादशाहास निवेदन केला. तंतर बादशाहा म्हणाला आह्मीं तुजला दाहोत्र्याची सनद करून देण्याची आज्ञा केली होती परंतु तुझे प्रारब्धानें ती दोहोत्र्याची बनून गेली आतां या गोष्टीस माझा उपाय काय जी गोष्ट झाली ती पुनः येत नाहीं. यास्तव जी सनद तुजला मिळाली ती ख-

री आहे त्याहून जास्त मिळणार नाही.

राजा वेश्या यमोऽग्निश्च तस्करो बा-
ल याचकौ ॥ परदुःखं न जानंति अ-
ष्टमो ग्रामकंटकः ॥१॥

अर्थ- राजा, वेश्या, यम, अग्नि, चोर, बाल, याचक हे सात आणि आठवा ग्रामकंटक म्हणजे गांव सोडून बाहेर कोठेंही न जातां स्वग्रामांतच राहून लोकांस पीडा करून आपला निरवाहा करणारा हे आठ दुसऱ्याच्या दुःखानें जाणत नाहींत आपलेंच कार्य करितात त्याप्रमाणें येथें ही झालें मग गृहस्थ पश्चात्तापांत पडला - आणि मनांत म्हणतो मोठे मोठे लोकांस पुष्कळ पैसा दिला आणि बारनिशीचा कारकून केवळ लहान-त्याचे हातांत काय आहे असें समजून त्यासधिःकारून टाकिलें यामुळें त्यानें आपलें कारकुनीच्या कसबानें माझे दांत पाडिले मी आपले गांवाहून येते समयीं कारकुनाचे दांत पाडण्याची योजना केली होती तीच माझे पदरीं पडली. असें म्हणून चरफडत आपले गांवीं निघोन गेला.

# कथा १० वी.

## जारिणी स्त्रीच्या गर्वभंगाविषयीं.

एक मुशाफर एके गांवाचे पानवठ्यावर बसला असतां त्या गावांतून एक तरुण स्त्री रूपानें सामान्य, वर्णानें अमावास्येची ज्येष्ट भगिनी (काळी डोकीवर घागर हातांत डोल घेऊन विहिरीवर उदकार्थ जात असतां त्या गृहस्थानें लक्षून तिजला प्रश्न केला कीं,

दोहरा.

घगरी घगरी घरसे निकली कहि
कि तेरी घगरी

हें श्रवण करून ती छिनाल स्त्री उत्तर देते.

सूने की मेरी घगरी रूपेका मेरा डोल, जडाव की मेरी चुंबली, तिनबिंदर का मोल

या प्रमाणे तिचें बोलणें ऐकून गृहस्थ मनांत म्हणतो ही स्त्री आपली योग्यता त्रैलोक्य सुंदरी

प्रमाणें मानून बोलत आहे यास्तव हीने चांगले दां-
त घशांत घालावे म्हणून म्हणाला.

मट्टीकी तेरी घगरी, सडे चामका डो-
ल घास मुसकी चुंबली तीन दमड्या
तेरा मोल

या प्रमाणें मुशाफराचें बोलणें ऐकून ती स्त्री ल-
ज्जायमान होऊन निघून गेली.

## कथा ११ वी.

### चतुर स्त्रीची.

एक तरुण स्त्री रूपानें केवळ अति सस्वरूप अ-
शी आपले कुचाग्रीं (स्तनाच्याशेंड्याकडे) पहात पहात
मोठे नखऱ्यानें मार्गानें जात होती तिला पाहून एक पु-
रुष काम मोहित होत्साता विनोदानें तिला प्रश्न करितो.

श्लोकाचापूर्वार्ध॥ ॥अधः पश्यति
किं बाले पतितं तव किं भुवि॥

अर्थ- हे बाले सकुमारे, तूं खालीं काय पहात्येस तु-
झी कांहीं वस्तू भूमीवर पडली आहे काय? हें ऐकून-

स्त्री फार चतुर होती तिनें त्याचें तें कपटाचें बोलणें-जाणून मनांत समजली कीं, हा मजला पाहून मोहित झाला आहे परंतु या दुष्टाजवळ भाषण न केलें तर हा आणखी कांहीं भाषण करील आणि यानें केलेलें भाषण जर कोणी ऐकिलें तर आपण अंतर्यामी पवित्र असतां ही जनापवाद येईल यास्तव याजला भिऊन उपयोग नाहीं असा विचार करून तिनें उत्तर दिलें.

श्लोकाचा उत्तरार्ध॥ ॥ रे रे मूर्ख न
जानासि गतं तारुण्यमौक्तिकम्॥१॥

अर्थ- अरे रे मूर्खा, तूं कसा जाणत नाहींस माझें तारुण्यरूपमौक्तिक गेलें त्यातें पहात आहे असें तिनें खरपूस भाषण श्रवण करून तो जारपुरुष खिन्नमुख होत्साता कांहीं न बोलतां आले मार्गानें निघून गेला.

पुरुष अथवा स्त्रिया जे सूज्ञ आहेत ते आपले शहाणपणानें दुसऱ्याच्या सहस्र शब्दांचें एकच शब्दानें खंडन करून त्यास निरुत्तर करितात.



# कथा १२वी.

## सूज्ञ व पतिव्रता स्त्रीची.

एक पुरुष शेजाऱ्याचे बायकोशीं व्यभिचार करावयास सवकला होता, त्यानें नित्यशः आपली बायको रात्रीस निद्रिस्थ झाली म्हणजे शेजाऱ्याचे स्त्रीचे घरीं जावें आणि स्त्री जों उठली नाहीं तों परत येऊन आपले बिछान्यावर निजावें असा क्रम बहुत दिवस चालत होता; परंतु ही पापाची गोष्ट किती दिवस छपून राहील? किती एक दिवसांनीं त्याचे बायकोस ही गोष्ट समजली ते समयीं तिचे तळव्याची आग मस्तकास गेली, परंतु करत्ये काय? ती अबला, तिचें काय चालणार? एके दिवशीं ती लौकर निजली नाहीं. भ्रताराजवळ कांहीं सुखदुःखाच्या गोष्टी बोलत बसली तों मध्यरात्र उलटून गेली आतां हा बाहेर जातो किंवा कसें हें पहावयाचे हेतूनें मिथ्या घोरावयास लागली. ते समयीं तिला झोंप लागली असें समजून नित्याप्रमाणें हा पुरुष उठून शेजारणीचे घरीं गेला तोंही

स्त्री सासरवाशीच होती तिचा नवरा वगैरे घरांत अ-सल्याची भीति म्हणून हा तेथें जाऊन तिचें छप्पर ओ-ढूं लागला तें असें कीं, ही खूण समजून ती स्त्री बाहेर उठून येईल परंतु ते समयीं तिचा भ्रतार जागाच घरीं होता यामुळें तिला येण्यास सवड नवती म्हणून ती-आंतून प्रश्न करित्ये.

दोहोरा.

अद्रातगई मद्रातगई निकली म-द्नको तारो कोन सौकनको बैल छु-टो छप्पर खेंचतो हमारो ॥

त्या संधीस त्या जार पुरुषाची स्त्री भ्रताराचे पाठी मागें येऊन छपून जवळच बसली होती तिणें-हें तिचें भाषण श्रवण करून ती म्हणात्ये.

हे सखी हाकदे हकालदे बैल छुटो हमारे हरी हऱ्याली छोडके छप्पर खेंचतो तुमारो ॥

याप्रमाणें आपले स्त्रीचें भाषण श्रवण करून - मग तो जार पुरुष आपले मानसांत फारच खिन्न झाला

आणि स्वस्त्री सहवर्तमान आपले घरीं निघून येत आहे इतक्यांत हें तिचें भाषण श्रवण करून घरवाला मोठे त्वेषानें हातांत बडगा घेऊन आला आणि आपले शक्ती प्रमाणें यथेच्छ त्या जार पुरुषास चंदी वैरण देऊन निघून गेला.

# कथा १३वी.

## हिऱ्या विषयीं.

एक गृहस्थ रोजगारा निमित्त देशांतरास गेला. त्याजला दैवयोगानें दहा तोळे वजनाचा हिरा सांपडला तो नित्यशः दहा तोळे सुवर्ण प्रसवत असे व अंधारांत ठेविला असतां त्याचा प्रकाश पडे असा मोल्यवान हिरा या गृहस्थाजवळ आहे ही बातमी चोरांचे टोळीस लागली म्हणून याचा पाठलाग करीत ते दहा पांच असामी चोर बहूत दिवस टपले होते परंतु त्यांजला संधी सांपडली नाहीं. हा गृहस्थ एका मोठे मानबर शहरांत येऊन तेथील राजाजवळ चाकरीस राहिला या मुळें त्या चोरांचा उपाय चालेना तेसमयीं त्यांनीं अशी चमत्कारिक युक्ती काढिली कीं, एका चोराची कन्या फार सुंदर होती तिला घेऊन राजाकडे आले आणि

त्यानीं विनंति केली कीं, महाराज हा आमचा जांवई एथें येऊन बहुत दिवस राहिला आहे याची बायको तरुण हिजला आह्मीं कशी सांभाळावी हा तर तिला आपले घरीं ही येऊं देत नाहीं यास्तव हिची कायती व्यवस्था आपले हातानें करावी. ते समयीं या गृहस्थास राजानें विचारिलें ते समयीं याणें सांगितलें महाराज, ती माझी बायको नव्हे मी तिज बरोबर लग्न केलें नाहीं, हे उगीच तुफान घेतात. परंतु हें त्याचें बोलणें राजास खरें वाटलें नाहीं या गोष्टीस किती एक दिवस झाले. तंतर ते चोर पुनः राजाकडे येऊन विनंति करिते झाले कीं, महाराज, उदईक दिपवाळी आहे यास्तव आमचे जामातास चार दिवस नगीकन्येचे मंदिरांत जाण्याची आज्ञा व्हावी अथवा आपले हातानें तिचा शिरच्छेद तरी करून टाकावा कारण तरुण स्त्री संभाळणें हें मोठें अवघड कृत्य आहे, हें ऐकून राजास फार दया आली आणि या गृहस्थास हाक मारून म्हणाला उदयीक तूं आपले स्त्रीचे महालीं जा न जाशील तर प्राणास मुकशील या प्रमाणें राजाज्ञा श्रवण करून गृहस्थ निरुपाया मुळें कबूल करिता झाला. इकडे चो-

रांनीं अशी मसलत करून कन्येस सांगितलें कीं, चार-दिवसांत जे वेळेस तो तुझे महालीं एकटा येईल ते वेळे-स तूं आह्मांस निशाण दाखवावें म्हणजे आह्मीं सारेजण येऊन त्याला मारून त्या जवळचा हिरा हरण करूं. नंतर दुसरे दिवशीं खुणा सांगितले जागीं हा गृहस्थ-चोरांच्या कन्येचे महालीं आला ते समयीं तिणें त्या-चें तें रूस्वरूप पाहून ती अत्यंत मोहित झाली आ-णि मनांत म्हणत्ये काय दुष्ट माझा बाप व त्याचे सोब-ती ? अशा पुरुषास मारून याचे जवळचें अमोल्यर-त्न हरण करणार हें नीट नाहीं आपण याजकडूनच-त्यांस मारवून याजला आपला पति करावा असा वि-चार करून त्यास म्हणाली हे जिवलगा ! तुला पाहून मी मोहित झाल्यें आहें यास्तव तुला सांगत्यें ऐक ! -माझा बाप व त्याचे सोबती हे सर्व चोर आहेत त्याणीं तुला मारण्याची मसलत करून बळेंच मी तुझी बाय-को असा बाहाणा राजाजवळ सांगून तूं इकडे येण्या-ची ही युक्ति त्यानीं केली आहे आणि हें निशाण मज-पाशीं देऊन सांगितलें आहे कीं, जेवेळेस तूं मजकडे

एकदा येशील ते वेळेस हें त्यांस मी दाखवावें म्हण-
जे ही खूण त्याणीं समजून येथें यावें आणि तुझा शि-
र छेद करून सत्व हरण करावें; परंतु मी तुला सांगतें
तसें कर तें असें कीं, आतां तूं येथून जा आणि दहा-
वीस पुरुष चांगले बळकट, हत्यार बंद येथें घेऊन ये.
नंतर मी त्यांस निशाण दाखविल्यें म्हणजे ते तत्काळ
येथें येतील मग तूं आपले माणसां कडून त्या संपूर्णां
स मारून भया निराळा हो. ते समयीं त्यानें तिचे मो-
ठे उपकार मानून निघून गेला. आणि दहा वीस शिपाई
हत्यार बंद घेऊन आला व त्यांस एकीकडे बसवून-
चोरांस निशाण दाखविलें, ते दुष्टेहे ळीतच होते नि-
शाण पाहातांच दौन दौन करून त्या महालांत शिरले
ते समयीं शिपायांनीं संपूर्णांचा शिरच्छेद केला नंतर-
त्या स्त्री बरोबर गंधर्व लग्न लाविलें आणि किती एक
दिवस तो त्या शहरांत निजसमवेत मोटे आनंदानें
काळ घालवीत राहिला. एके दिवशीं तो राजास व-
स्त्रियेस विचारून आपले गांवीं आला तों त्याची-
स्त्री घरीं बहूत दिवस एकटी असल्यामुळें स्वेच्छा-

चारी म्हणजे जारिणी झाली ही गोष्ट त्यास माहीत नवती. हा गृहस्थ बहूत दिवसांनीं घरीं आला म्हणून तिनें त्याचें आतिथ्य उत्तम प्रकारें केलें या योगें त्याचें ही मन समाधानानें पावलें. रात्रीस तें रत्न आपले स्त्रियेस दाखविलें ते समयीं तिनें तें त्याज पासून आपले जवळ मागून घेतलें व त्याणें ही देण्यास कांहीं शंका घेतली नाहीं कारण हिचें दुश्चरण त्यास माहित नवतें. नंतर त्यास निद्रा लागली असें पाहून स्त्री उठली आणि तिचा दोस्त एक सोनार होता त्याजकडे गेली व तें रत्न त्यास दाखविती झाली आणि म्हणाली याची एक आंगठी मला करून द्यावी, ते समयीं तें रत्न या पारख्यानें पाहातांच अलभ्य लाभ समजून उठला आणि एक आंगठी आणून तिचे हातांत घातली ते समयीं ती स्त्री आपले मानसांत फारच खुष झाली आणि कार्यभाग उरकून निघून येऊन नवऱ्या शेजारीं निद्रा करिती झाली. प्रातःकाळीं हा गृहस्थ उठला आणि बायकोस हांक मारून म्हणाला रात्रीचा तो कोठें आहे ते समयीं तिणें आंगठी दाखविली ती पाहून

त्यानें मस्तक अगदीं फिरून गेलें आणि त्या योगानें त्यास वेड लागलें. कोणी मनुष्य पाहिलें म्हणजे त्यास विचारी कीं, रात्रीचा तो कोठें आहे परंतु हें आंतील वर्म कोणास ही माहीत नव्हतें सर्व गांवभर यास वेड लागलें असें म्हणत असत. इकडे चोराचे कन्येनें याची येण्याची मुदत सरली परंतु आला नाहीं म्हणून निघून त्याचे गांवीं आली आणि चौकशी केली तों त्यास वेड लागलें आहे असें समजलें ते समयीं तिनें हा आपला भ्रतार वगैरे गोष्टी प्रसिद्ध न करतां त्याचे स्त्रीचे आचरणादिकाचा तपास करूं लागली. ते समयीं ती गोष्ट प्रसिद्धच होती म्हणून तिला ही फारच लौकर तिचा शोध लागला कीं, ती जारिणी आहे व तिचा सोयरा एक सोनार आहे. नंतर तिणें उत्तम प्रकारचा पोषाख करून त्या सोनाराचे घरीं गेली आणि म्हणाली मी अमुक देशाच्या राजाचे स्त्रीची दासी आहें. आमचे बाईसाहेबांस कांहीं जवाहीर करणें त्यांचें आहे यास्तव तूं चांगला कसबी आहेस अशी तुझी कीर्ती श्रवण करून येथें आल्यें आहें असें बोलू-

न खूब खेचून दोन नयन शर फेंकले त्या योगें करून तो अगदीं वेडा होऊन गेला. ते समयीं स्त्री म्हणाली अरे तूं ष-ला पाहून इतका कामातूर झाल्या सारखा दिसतोस तर-आमचे बाई साहेबांस पहाशील तर तुझी कशी अवस्था होईल कोणजाणे? हें ऐकून तिला पहाण्याची त्यास फा-रच इच्छा झाली. आणि तिची विनवणी करूं लागला ते समयीं ती म्हणाली तिला ज्या पुरुषानें पाहिली त्या-नें तीजशीं विलास न केल्यास जिवंत राहील असा फा-र दुर्लभ कारण फारकाय सांगावें जो षंढ पुरुष असे-ल त्यास ही तिचे अवलोकनानें पुरुषत्व प्राप्त होईल.आ तां तीही तुला प्राप्त करून दिली असती परंतु करावें काय? तूं गरीब आणि तिचा असा निश्चय आहे कीं,-दिवसास सूर्य व रात्रीस दीप यांचे समक्ष परपुरुषा-चें मुखावलोकनही ती करीत नाहीं व अंधारांत वि-लास तिजला आवडत नाहीं यास्तव सूर्य चंद्र व दीप या वांचून प्रकाश पाडून त्या पुरुषा बरोबर मोठे प्रीती-नें विलास करणें तिला फार प्रिय आहे हें ऐकून सोनार ह्मणाला कांहीं चिंता नाहीं, असें मी करितों तिला घेऊन ये.

ते समयीं ही चोराची कन्या समजली कीं, हिरा याजपाशीं आहे मग त्यास म्हणाली उद्ईक दहा घटिका रात्रीस आम-च्या बाई साहेब एकट्याच तुझे घरीं येतील तूं प्रकाशपा-डून तयारींत ऐस या प्रमाणें सांगून निघून गेली. दुसरे-दिवशीं दहा घटिका रात्रीचे सुमारास उत्तम प्रकारचा-पोषाख करून निघाली आणि कांहीं केफी पदार्थ बरो-बर घेऊन सोनाराचे घरीं येऊन पहात्ये तों त्यानें ए-का डबींत तो उंच मोलाचा सुंदर हिरा ठेऊन त्या योगें प्रकाश पाडून मार्ग प्रतीक्षा करीत बसला आहे इतक्यां-त ती तस्कर कन्या प्राप्त झाली. आणि पाहात्ये तों हा-अगदीं एकाग्रतेनें आपली मार्ग प्रतीक्षा करीत आहे हिणें निराळा उंच मोलाचा पोषाख केला होता आणि त्याचें मन राजपत्नीचे रूपाकडे वेधलें होतें म्हणून-त्यानें हिजला न ओळखतां राजपत्नीच समजून उठ-ला आणि तिचे गळ्यास मिठी घालण्यास धांवला-ते समयीं तिनें धुडकावून म्हणाली परस्पर क्षेमपु-सल्या खेरीज आतुरपणा जो पुरुष करितो त्याची गण-ना श्वानांत होते. हें तिचें कडक भाषण ऐकून थोडा श्र

ह्रीवर आला आणि तिचे इच्छेवर भरवसा ठेवून ती ज-
सें सांगेल तसें मान्य करूं लागला. ते समयीं तस्कर क-
न्येनें एक अमली पदार्थ विड्यांत घालून तो विडा मो-
ठे नखऱ्यानें प्रीती पुरस्सर भाव दाखवून त्याचे तोंडांत
घातला तो त्याणें मोठे आनंदानें ग्रहण केला तो तत्का-
ळ त्यास निद्रा प्राप्त झाली. नंतर या स्त्रीनें तो हिरा व
आणखी कांहीं उंच मोलाचे पदार्थ त्याचे घरांतील घे-
ऊन निघून आली. आणि प्रातःकाळीं आपले भ्रतारा
कडे येऊन त्याजपाशीं कांहीं शब्द बोलली तों तो म्ह-
णाला रात्रीचा तो कोठें आहे असें म्हणतांच तिनें तो-
हिरा पुढें केला हिरा पहातांच देहावर येऊन तिजला
कधीं आलीस, कां आलीस वगैरे समाचार विचारूं-
लागला ते समयीं तिनें त्याचे स्त्रीचें चरित्र त्यास निवे-
दन केलें. इकडे सोनार निशा उतरल्यावर जागृत झा-
ला आणि पहातो तों राजपत्नी नाहीं. ते समयीं तो म्ह-
णूं लागला रात्रीची ती कोठें आहे हेंच वेड त्यास लागलें-
तदनंतर हिनें आपले भ्रतारास बरोबर घेतलें व आप-
ण पहिल्या प्रमाणें उंच पोषाख करून व भ्रताराचे हा

तांन चाबूक देऊन सोनाराचे घरीं आपादमस्तक बुरखा घे-
ऊन गेली. आणि भ्रतारानें त्याजपाशीं कांहीं शब्द बोलल्या-
वर सोनार म्हणाला रात्रीची ती कोठें गेली. असें म्हणतां-
च तिणें आपले आंगावरचा बुरखा काढून म्हणाली मी-
आहें ही? तिला पाहातांच तोही सावध झाला नंतर हि-
चे भ्रतारानें त्याची यथेच्छ लत्ता मुष्टि प्रहारें करून बरे-
च कर्णीक मऊ केली तेसमयीं तोही चांगला शुद्धीवर आ-
ला नंतर उभयतां आपले घरीं येऊन आनंदानें कालक्र-
मणा करिती झालीं.

## कथा १४ वी.

### नीती विषयीं.

एकाशहरांत गोविंदराव म्हणून एक गृहस्थ रहा-
त होता. त्याचे घरीं रघुनाथ शास्त्री म्हणून त्या शहरांत
मोठा नामांकित विद्वान् रहात असे तो आला ते समयीं
गोविंद रावानें त्याचा आदर सत्कार करून कांहीं गोष्टी-
लत बसले आहेत इतक्यांत एक ब्राह्मण फारच विद्वान प-
रंतु दरिद्री होता तो येऊन गोविंद रावास म्हणाला माझे-

याला तीस वर्षें झालीं अद्याप लग्न झालें नाहीं कारण आपले सारिखे द्रव्य देण्यास बहुत कबूल होते परंतु मी गरीब यामुळें वधु मिळेना प्रस्तुत एक वधू मिळत आहे परंतु ज्याणीं द्रव्य देण्याचें कबूल केलें होतें त्यां पैकीं एकही एथें हजीर नाहीं. कोठें ग्रामांतरास गेले आहेत यास्तव आपण संपन्न असून दानशील आहां म्हणून आपलेकडे आलों आहें तरी हें कार्य आपण करून दिलें पाहिजे दीन अनाथाचें कार्य आपले हातून घडल्यास ईश्वर संतोष व जनांत कीर्ति होईल ते समयीं जवळ रघुनाथशास्त्री होते ते म्हणतात गोविंदरावजी अशा ब्राह्मणाचीं कार्यें करावीं हें तुह्मां सारिख्या गृहस्थास योग्य आहे. तुह्मा सारिख्यांनीं जर अशीं कामें मनावर घेतलीं तरच आपला गृहस्थाश्रम धन्य नाहीं पेक्षां तो गृहस्थ कशाचा गृहस्थाश्रमीं जो धन्य त्यांस त्याहून स्वर्ग विशेष नाहीं याविषयीं वचन.

**श्लोक॥ ॥सानंदं सदनं सुताश्च सुधियः कांता न दुर्भाषिणी। स्वेच्छापूर्णधनं स्वयोषिति रतिः स्वाज्ञा पराः सेवकाः॥ आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदि-**

नं मिष्टान्न पाने गृहे । साधोः संगमु-
पासते च सततं धन्यो गृहस्थाश्रमः॥१

अर्थ- या लोकीं ज्यानें गृह सदा आनंदयुक्त, ज्याचे पु
त्र बुद्धिमंत, स्त्री दुर्भाषण न करणारी इच्छेनें पूर्ण कर
णारें धन ज्याला अनुकूल स्वस्त्रीचे ठायीं ज्याची प्रीति
सेवक जन ज्याचे आज्ञेंत, ज्याचे गृहीं प्रति दिवशीं अति
थीचें पूजन, शिव पूजन आणि मिष्टान्न पान ज्याला
निरंतर प्राप्त असून साधू संगानें जो सदैव सेवितो त्या-
चा गृहस्थाश्रम धन्य जाणावा. यापरतें त्याला स्वर्ग-
लोकीं सुख विशेष नाहीं आणि जर सत्पात्रीं दान केलें
तर तें कसें वृद्धिंगत होतें म्हणाल तर ऐका:—

जले तैलं खले गुह्यं पात्रे दानं मना-
गपि॥ प्राज्ञे शास्त्रं स्वयं याति वि-
स्तारं वस्तुशक्तितः॥१॥

अर्थ- उदकाचे ठायीं तेल, खल पुरुषाचे ठायीं गु-
ह्य भाषण, सत्पात्रीं अल्प ही दान, बुद्धिमंताचे ठायीं शा
स्त्र हीं सर्व पूर्वोक्त स्थळीं अर्पिलीं असतां आधार भ
त वस्तूच्या स्वभावें करून आपो आप विस्तारा प्रत पा

वनात ह्या त्या त्या स्थळांचा स्वाभाविक गुणच आहे दु-
सरें असें आहे कीं,

आर्तेषु विप्रेषु दयान्वितश्च यः श्रद्ध-
या स्वल्पमुपैति दानं ॥ अनंत पारं समु-
पैति राजन् यद्दीयते तन्न लभेद्विजेभ्यः॥१

अर्थ- ब्राह्मण दरिद्रानें पीडित असतां अल्प द्रव्य त्या-
ला देतो तें दिलेलें द्रव्य अनंत दात्यांप्रत पावतें तस्मात्
सत्पात्र ब्राह्मणा कारणें जें दिलें त्याचें अनंत पार प्रा-
प्त होतें. या संसारांत मनुष्यानें कसें कोणाजवळ वा-
गावें याविषयी वचन.

दाक्षिण्यं स्वजने दया परजने शाठ्यं
सदा दुर्जने प्रीतिः साधुजने स्मयः
खलजने विद्वज्जने चार्जवम् ॥ शौ-
र्यं शत्रुजने क्षमा गुरुजने नारीजने -
धूर्तता इत्थंये पुरुषाः कलास कुश-
ला स्तेष्वेव लोके स्थितिः ॥ १॥

अर्थ- स्वकीय जनाचे ठायीं दक्षपणा, परजनीं दया, दु-
र्जनाचे ठायीं शठपणा, साधुजनाचे ठायीं प्रीति, खल जना

ने ठायीं गर्व, विद्वज्जनाचे ठायीं अवक्रता, शत्रूचे ठायीं शौर्य, गुरूचे ठायीं सहनता, स्त्रीचे ठायीं धूर्तता ठेवणें या प्रकारें करून जे पुरुष दक्षता ठेवितात ते या जनांत उत्तम स्थिती प्राप्त पावतात. यास्तव आपल्यास सर्व गोष्टी अनुकूल आहेत व त्याप्रमाणें आपलें आचरण ही आहे यास्तव या ब्राह्मणाचे कार्यास आपण कांहीं मदत करावी हें फार उत्तम आहे. या प्रमाणें गोविंदरावानें शास्त्री बावांचें भाषण श्रवण करून त्या ब्राह्मणास दोनशें रुपये व कांहीं कापड आणून दिलें ते समयीं ब्राह्मण फार संतोष पावून आपले घरीं निघोन गेला. तदनंतर गोविंदराव म्हणाला कायहो शास्त्री बावा, आमचे हातून काय पडणार, संध्याही वेळेवर होत नाहीं मग बाकीचें कशास विचारितां. हें ऐकून शास्त्री बावा म्हणतात बोलतां हें चांगलें नाहीं कारण शास्त्रांत असें सांगितलें आहे.

विप्रो वृक्ष स्तस्य मूलं च संध्या वेदः
शाखा धर्मकर्माभिपत्रे ॥ तस्मान्मूलं यत्नतो रक्षणीयं छिन्ने मूले नैव
शाखा न पत्रे ॥ १ ॥

अर्थ.- ब्राह्मण हाच कोणीएक वृक्ष त्यानें मूळ संध्या, शाखा वेद, धर्म आणि कर्मे हीं त्याचीं पर्णे होत यास्तव तें त्याचें मूळ यत्नेंकरून रक्षावें म्हणजे यथा कालीं संध्या करावी. मूळाचा नाश झाला असतां शाखा आणि पत्रें उत्पन्न व्हावयाचीं नाहींत. यास्तव ब्राह्मण पणाचें मूळ संध्या होय आणि तीच तुह्मीं करीत नाहीं असें म्हणतां मग ब्राह्मण तरीं कशाचे? यास्तव कितीही कामें जरीं असलीं तरी तीं एकीकडे ठेवून मुख्यत्वें ब्राह्मणानें संध्या वेळेवर करावी हें ऐकून गोविंदराव म्हणतात तसें नाहीं आम्ही व्यापारी ब्राह्मण आमचे हातून सत्कर्मे कांहींच घडत नाहींत असा माझे बोलण्यातील भावार्थ आहे. रघुनाथ शास्त्री म्हणतात ब्राह्मण पुष्कळ प्रकारचे आहेत, व त्यांचीं लक्षणें शास्त्रांत सांगितलीं आहेत. हें एकून गोविंदराव म्हणतात कोणते ब्राह्मणाचीं कशीं लक्षणें आहेत तीं कृपा करून सांगाल तर ऐकण्याची इच्छा आहे ते समयीं शास्त्रीबावा सांगतात.

अकृष्टफलमूलानि वनवासरतः सदा॥
कुरुतेऽहरहः श्राद्धं ऋषिर्विप्रः स उच्यते॥१॥

अर्थ- कर्षणा वांचून उत्पन्न झालेलीं फळें व मूळें भक्षून सर्वकाळ वनांतच रहातो आणि त्यांहींच नित्यश्राद्धादि करितो तो ब्राह्मण ऋषी म्हणावा आतां द्विजांचीं लक्षणें सांगतों.

एकाहारेण संतुष्टः षट्कर्मनिरतः-
सदा॥ ऋतुकालाभिगामी च स विप्रो
द्विज उच्यते॥ २॥

अर्थ- एक वेळ भोजन करून निरंतर संतुष्ट, यजनादि षट्कर्मीं रत, ऋतु कालींच स्त्रीसंग करणारा, असा जो विप्र तो द्विज म्हणावा. आतां वैश्य ब्राह्मणाचीं लक्षणें सांगतों.

लौकिके कर्मणि रतः पशूनां परिपालकः॥ वाणिज्य कृषिकर्माणि स विप्रो वैश्य उच्यते॥ ३॥

अर्थ- कामानें यांचीं लौकिक रक्षण करून जो रत आणि पशूंचें पालन करणारा तसाच वाणिज्य कृष्यादि कर्मे करणारा असा जो तो वैश्य ब्राह्मण म्हणावा. आतां शूद्र ब्राह्मणांचीं लक्षणें सांगतों.

लाक्षादि तैलनीलीनां कौसुंभ मधु सर्पिषाम् ॥ विक्रेता मद्य मांसानां स विप्रः शूद्र उच्यते ॥ १ ॥

अर्थ- लाक्षादि पदार्थ, तेल, नीळ, पीतांबर, मध, तूप, मद्य म्हणजे दारू व मांस यांचा विक्रय करणारा जो तो शूद्र ब्राह्मण जाणावा. आतां मार्जार ब्राह्मणांची लक्षणें सांगतों.

परकार्य विहंताच दांभिकः स्वार्थसाधकः ॥ छलद्वेषी मृदुः क्रूरो विप्रो मार्जार उच्यते ॥ १ ॥

अर्थ- दुसऱ्याचें कार्य नाश करणारा, दांभिक, आपला अर्थ साधणारा, कपटानें द्वेष करणारा, बाहेर मृदु अंतरीं क्रूर असा जो तो मार्जार ब्राह्मण समजावा. आतां म्लेंच्छ ब्राह्मणांचीं लक्षणें सांगतों.

वापी कूप तडागानामाराम स्करवेश्मनाम् ॥ उच्छेदननिराशंकः स विप्रो म्लेंच्छ उच्यते ॥ १ ॥

अर्थ- वापी, कूप, तलाव, बाग, देवालय यांचा नाश करावयास जो शंका पावत नाहीं असा जो तो म्लेंच्छ जा-

णावा. आतां चांडाल ब्राह्मणांचीं लक्षणें सांगतों.

देवद्रव्यं गुरुद्रव्यं परदाराभिमर्शनम्॥
निर्वाहः सर्वभूतेषु विप्रश्चांडालउच्यते॥१

अर्थ- देव, गुरु, यांचें द्रव्य हरण करणारा आणि परस्त्री चा अभिशम करणारा, सर्वभूतीं विधि निषेध सोडून देह्याचा निर्वाह करणारा असा जो ब्राह्मण तो चांडाल जाणावा. रघुनाथ शास्त्री म्हणतात. गोविंद रावजी, या सात प्रकारें करून ब्राह्मण आहेत हे आप आपले आचारा वरून त्यात्या योग्यतेस जातात यास्तव ज्या कुळांत जन्म धारण झालें तो कुलधर्म सोडून अन्य रीतीनें लोक वागूं लागले म्हणून हे असे सात प्रकार झाले. आतां या पेक्षां आणखी ही किती भेद कालें करून होतील व झाले असतील हें कोण जाणे? गोविंद राव म्हणतात ही गोष्ट खरी आहे. अलीकडे सर्व ज्ञातींनीं आपआपले धर्म सोडून पर धर्माचा अंगिकार करूं लागले आहेत ते समयीं रघुनाथ शास्त्री म्हणतात ही गोष्ट खरी आहे. मी एकवेळ मुंबईस जात असतां मला कल्याणास एका मित्रास भेटावयाचें होतें म्हणून तेथें उतरलों होतों

नंतर दुसरे दिवशीं निघून आगगाडीचे मकाणावर आलों तेथें ते दोन गोरे लोक पाद्री ज्याला म्हणतात ते बसले होते मी तेथें जातांच म्हणाले तुह्मीं कोठें रहातां व कोठें जाणार आणि तुमचें नांव काय ते वेळेस आपला ठिकाण व नांव वगैरे त्यांस सांगितलें ते समयीं ते मला म्हणाले काय हो शास्त्रीबावा, आह्मांस तुमचा गायत्री मंत्र येतो इतकें बोलून त्यानीं तो मला म्हणून दाखविला आणि विचारिलें कसें काय यांत कांहीं अशुद्ध असल्यास आह्मास सांगावें हे शब्द ऐकून फार काय परंतु मजला मोठें आश्चर्य वाटलें म्हणून कांहीं न बोलतां उगीच बसलों तेव्हां त्यांतील एकजणानें आपलें बायबल म्हणून धर्मपुस्तक काढून म्हणाला तुह्मीं कांहीं आमचे प्रश्नाचा जबाब दिला नाहीं. आमचे मनांत धर्मा विषयीं तुह्मां जवळ कांहीं बोलावयाचें आहे तेव्हां समजलों कीं, हे आपले जातीवर जातील आणि आमचे धर्माची निंदा करतील मग तरी यांज बरोबर भांडावें लागेल तें अगोदरच यांचे चांगले कान उघडावे हें उत्तम म्हणून त्यांस सांगितलें तुह्मीं गायत्री मंत्र

म्हटलाच नाहीं आणि शब्द अशुद्ध सांगणारानें काय सांगावें ते वेळेस त्यानें हातांतील काठी भूमीवर आपटून म्हणाला काय हो असें कसें म्हणतां मला वाटतें तुह्मांस गायत्री मंत्र येत नाहीं तेव्हां मी सांगितलें ज्याला गायत्री मंत्र येत नाहीं तो ब्राह्मणच नव्हे या बोलण्यावर त्यास बोलावयास संधी सांपडली म्हणून म्हणाला तुह्मीं ब्राह्मण असून तुह्मांस गायत्री मंत्र येत नाहीं आणि आह्मीं ब्राह्मण नसून आह्मास येतो यावरून आह्मीनर आतां ब्राह्मण झालों असें म्हणावयास फारशी अडचण नाहीं. ते समयीं माझें मस्तक अगदीं फिरून गेलें म्हणून त्यास युक्तीचे वाटेनें विचारिलें कोणी एक मनुष्यास तुझ्या किंवा माझ्या सारिख्यानें धरून आपून जर हुकूम केला कीं याजला फांशीं द्यावा तर ती शिक्षा अमलांत येईल किंवा नाहीं हें ऐकून तो म्हणाला जर अधिकार सरकारानें दिला असेल तर अमलांत येईल नाहींतर उलटी शिक्षा मिळेल ते समयीं मी विचारिलें जीं अक्षरें जज्ज बोलतात तींच मी बोललों असतां शिक्षा कां बरें होईल पाद्री म्हणाला तुह्मांस

अधिकार नसतां जें कृत्य तुम्हीं केलें त्याजवरून अपरा-
धी झालां म्हणून शिक्षेस पात्र झालां मगमी म्हटलें गा-
यत्री म्हणण्यास तुम्हांस अधिकार नसतां तुम्हीं आप-
ले मतानें गायत्री मंत्र म्हणतां तेव्हां यावरून तुम्हीं अप-
राधी झालां आहांत तर तुम्हांस शिक्षा कां नसावी जसें-
भागीरथीचें उदक पवित्र खरें परंतु तें नदीचे ओघाचे
ठिकाणीं मात्र पवित्र तेंच भागीरथीचें उदक जर कोणी-
शौच कूपांत ओतलेलें मोरीचे वाटेनें बाहेर आलें तर तें ज-
सें पवित्र नाहीं तसा ज्याला जो अधिकार प्राप्त झाला आ-
हे त्याणेंच तें कृत्य केलें पाहिजे भलत्यानें केल्यास तें उप-
योगी नाहीं शास्त्रावरून गायत्री मंत्राचा अधिकार ब्रा-
ह्मणासच आहे तर तो मंत्र ब्राह्मणाचे मुखांतून निघा-
ल्यास मात्र खरा अन्यत्र मुखांतून निघाला असतां ज-
सें भागीरथीचें उदक असून शौच कूपांतून वाहालेलें
त्या प्रमाणेंच हाही प्रकार आहे यास्तव तुमची समजूत
जी अज्ञान पणाची आहे ती एकीकडे ठेवून शुद्धी वर या.
असें म्हणतांच ते दोघेही निरुत्तर झाले आणि तेथून
उठून पल्लीकडे जाऊन दुसरे ठिकाणीं बसले यावरून पा-

हा जर त्यांना स्वधर्म हा काय व त्याचा परिणाम कसा-
हें माहित असतें तर याकृत्यांत ते शिरलेच नसते दुस-
रे दिवशीं मी मुंबईस एका पाताण्या परभूचे घरीं गेलों
तों त्यानें हातांत अभिषेकपात्र धरून रुद्र म्हणत हो-
ता मला पाहातांच हळू हळू म्हणावयास लागला. मा-
झें त्याजकडे कांहीं काम होतें म्हणून थोडावेळ तेथें ब-
सावें लागलें नंतर एक घटकेनें त्याची पूजा आटोपल्या
वर तो बाहेर आला आणि इकडील तिकडील गोष्टी प्र-
थम काढून नंतर म्हणाला कां शास्त्रीबावा माझा पहिला
सोकरा आहे त्याची मुंज ज्येष्ठ मासीं करावयाची आहे,
कोणी म्हणतात होत नाहीं ते समयीं मी त्यास म्हटलें तु-
मच्या मुंजी बारामहिने होतात कधींच प्रतिबंध नाहीं ते
समयीं तो म्हणाला मग तुमच्या कां बारामहिने करीत ना-
हींत. ते समयीं मी सांगितलें तुह्मा शूद्रांस मुंजी मुळींच
नाहींत आणि असें असून तुम्ही करितां याचें कारण इ-
तकेंच कीं, राजा धर्माधर्म पहात नाहीं यामुळें हीं अशीं-
कर्में घडतात. मद्य मांस भक्षक जे तुह्मीं त्या तुमच्या मुं-
जी कशाच्या? ज्यास गायत्रीमंत्राचा अधिकार आहे त्या-

चीन मुंज होत्ये अन्याची मुंज करणें हें त्याचा केवळ दुरा ग्रह समजावा. तुमच्या मुंजी जर कराव्या तर मग पाद्रीच्या मुलांच्या कां करूंनये तर ज्या कुलांत जन्म झाला त्या कुलधर्मास सोडून जो परधर्म आचरतो तो शेवटीं नरकाप्रत गमन करितो यास्तव जबरदस्तीनें तुह्मी बेधडक दुसऱ्याचे घरांत शिरतां म्हणजे परधर्म आचरतां या योगानें तुह्मांस इहलोकीं व परलोकीं सुख लेश ही प्राप्त होणार नाहीं ते समयीं त्यास मोठा राग आला आणि मला म्हणाला कांहो शास्त्रीबावा तुह्मीं ब्राह्मण लोक आमचे जातीचा इतका द्वेष करितां याचें कारण काय? मी सांगितलें अहो भाईसाहेब तुमचे वडिलांनीं आमचे वडिलाच्या बोरी बाभळी कापल्या नाहींत परंतु तुह्मीं आमचा धर्म आचरण करितां आणि अधर्म मानीत नाही म्हणून तुमच्याशीं द्वेष आहे. दुसरें कांहीं कारण नाहीं मोठा भाई म्हणाला कसा बरें? तेव्हां त्यांस सांगितलें अहो तुम्हीं आमच्या प्रमाणें लग्नें मुंजी श्राद्ध पक्ष करितां, देवपूजा रुद्राभिषेक स्नान संध्या ही करितां? आणि आमचे अधर्म म्हणजे मांस मद्य (दारू) इत्यादि भक्षण वर्ज क-

रीत नाहीं. या मुळें द्वेष आहे दुसरें कांहीं नाहीं ते समयीं तो म्हणाला आह्मीं मद्य मांस खातों असें तुह्मीं कशाव-रून म्हणतां इतक्यांत घरांतून बाल्या गडी आला आ-णि म्हणाला शेट तो आला हाय त्यानें विचारिलें कोणरे, बाल्या म्हणतो देवकार्यास बकरीं आणलीं होतीं त्या-पैकीं अजून चवदा बोकडांचा पैका द्यायाचा हाय असें ऐकतांच त्यास राग आला आणि त्या बाल्याला लाता मारीत मारीत घरांत गेला आणि म्हणाला तो भट बाहे-र बसला आहे त्याचे देखत तूं असें कसें बोललास-तो म्हणाला आपला भट हाय त्याची येवढी चोरी ती का-य म्हनून भट झालातर आमचें काय करितो असें म्हणू-न मागले दारीं गेला आणि मोठा भाई बाहेर येऊन मा-झे जवळ बसला. ते समयीं मी विचारिलें भाईसाहेब; ल बाड बोलणें ईश्वरास सहन होत नाहीं म्हणून त्याणे-च हा असा प्रसंग आज आणिला आतां आपलें कां-हीं बोलणे आहे काय? ते समयीं मोठा भाई उगाच खा-लीं मान घालून लज्जायमान झाला. तात्पर्य- ज्याला स्नान संध्येचा अधिकार आहे ते करीत नाहींत व ज्या-

नां अधिकार नाहीं ते करूं इच्छितात. एवंच उभय नरका-
चें कारण दिसतें. गोविंदराव म्हणतात काय शास्त्री बा-
वा मुंबईच्या गोष्टी तुह्मास माहितच नाहींत त्या ऐकाल
तर फारच कठीण आहेत शास्त्री बावा म्हणतात जळो-
त त्यांच्या गोष्टी अशा अधर्म्यांचें नावही काढूं नका मी
जातों असें म्हणून निघून जातो.

# कथा १५ वी.

## एक लक्षाचे गोष्टी विषयीं.

एक सावकार कांहीं व्यापारा करितां देशांतरास
गेला होता, तो आपले गांवीं परत येत असतां मार्गांत वि-
श्रांती करितां त्याज बरोबर एक शिपाई होता त्यास म्हणा
ला कांहीं गोष्ट सांग ते समयीं तो म्हणाला माझे गोष्टी-
स लाख रुपये पडतात ते जर आपण द्याल तर गोष्ट सां-
गतों ते समयीं तो मनांत म्हणाला अशी काय लाख रु-
पयांची गोष्ट आहे ती ऐकावी म्हणून त्यास म्हणाला ठी-
क आहे घरीं गेल्यावर देईन. ते समयीं त्यानें सांगितलें
असा करार लिहून द्या. म्हणजे सांगतों ते व्हां त्याजला

लिहून दिलें नंतर त्याणें गोष्ट सांगितली ती ही कीं,-
राजाचें मित्रत्व मानूंनये झाली गोष्ट तेव्हां सावकार म्ह-
णाला कायरे तूं मला ठकविलेंस या दोन अक्षरांचे तुला
लाख रुपये कसे मिळतील बरें दुसरी गोष्ट सांग ते सम-
यीं शिपाई म्हणाला दुसरे लाख पडतील. ते ही त्याणें
देण्याचें कबूल केलें नंतर शिपाई म्हणाला, दुसरी गो-
ष्ट ही कीं, व्यवहार केला असतां लिहिणें जो साफ ठेवी-
त नाहीं त्याचा व्यापार बुडेल. झाली गोष्ट. तेव्हां साव-
कारानें तिसरी गोष्ट सांगावयास सांगितलें ते समयीं
त्यानें त्या पासून तीन लक्ष रुपये देण्याचा करार लि-
हून घेतला आणि तिसरी गोष्ट सांगितली ती ही कीं,
स्त्री जाती जवळ गुह्य गोष्ट बोलूं नये. झाली गोष्ट. नं-
तर कित्येक दिवसांनीं आपले घरीं गेला तेव्हां शिपा-
ई तीन लाख रुपये मागूं लागला. ते समयीं सावकार
म्हणाला तीन लाख रुपये काय वाटेवर पडले आहे-
त तेव्हां शिपायानें पराकाष्ठा करून पाहिली परंतु
सावकार रुपये देईना म्हणून राजाकडे जाऊन फिर्या-
द केली तेव्हां राजानें सावकारास बोलावणें पाठविलें

त्या वेळेस त्यास कांहीं काम होतें आणि राजाचा व सावकाराचा पराकाष्ठेचा स्नेहभाव होता. म्हणून सांगून पाठविलें कीं, या वेळेस येत नाहीं सायंकाळीं येईन असा निरोप ऐकतांच आज्ञाभंगामुळें राजास अतिशय क्रोध आला आणि तत्काळ त्यानें कोतवालास बोलावून आज्ञा केली कीं, सावकाराचें रोकड सर्व द्रव्य हरण करून आणावें व त्यास बंदीवान करून हजीर करावा. तेसमयीं कोतवालानें तसें केलें. तंतर न्यायकरून राजानें त्या शिपायास तीन लाख रुपये देऊन बाकी द्रव्य आपले जामदार खान्यांत टाकिलें व सावकारास सोडून दिलें तेसमयीं सावकार आपले घरीं येऊन पाहातो तों जवळ शिल्लक नाहीं व लोकांचे ठेवी बद्दल तगादे येऊन बसले आहेत म्हणून दिवाणास विचारिलें पुढें विचार कसा काय करावा जमाखर्चाच्या वह्या घेऊन ये तेसमयीं दिवाणानें जमाखर्चाच्या वह्या आणिल्या आणि सावकाराचे पुढें ठेविल्या तेसमयीं सावकार पाहूं लागला तों जमाखर्चांत सारा दिवाण वगैरे मुनिमानीं गोंधळ करून टाकिला आ-

हे कशास कांहीं मेळ नाहीं ते समयीं त्यास वाटलें-कीं, दोन गोष्टींचा अनुभव तर आला. एक राजा जवळचे स्नेहामुळें सर्वस्व हरण झालें. दुसरें जमारवर्चा कडे मी आज पर्यंत लक्ष पुरविलें नाहीं यामुळें सारा व्यापार बुडाला. नंतर जें कांहीं जवळ होतें तें मोडतोड करून ज्यांचा त्यांस पैसा दिला. जवळ कांहीं-राहिलें नाहीं फक्त घरमात्र रहावयास उरलें जवळ कोणी गडी माणूस नाहीं बायको व आपण अशीं दोघेंच राहिलों जवळ पैसा नाहीं. इकडे त्या गोष्टी सांगणाऱ्या शिपायास तीन लाख रुपये मिळाले होते. त्यानें या सावकाराचे घरासमोर जागा घेऊन एक मोठी हवेली बांधली. आणि मोठे थाटानें रहात होता. या मुळें तें पाहून सावकारास वैषम्य वाटे परंतु करतो काय! हा अगदीं भिकारी होऊन गेला यामुळें गांवांत कोठें बाहेर जाण्यास देखील लाज वाटूं लागली. यामुळें घरांतच निरंतर रहात असे तेव्हां मागील जुने कागद पत्र पाहूं लागला त्यावेळस त्याजला वडिलोपार्जित एक कागद सांपडला त्यांत असें-

लिहिलें होतें कीं, अमुक जाग्यास अमुक हातांवर अमुक द्रव्य पुरून ठेविलें आहे हें ज्या पुरुषास अगदीं मोठा प्रसंग येईल कीं, अन्नास महाग होईल ते वेळेस हें काढावें मध्यंतरीं मात्र कोणीही पुरुषानें तें काढूं नये. असा कागद सांपडला ते समयीं जवळ पैसा नाहीं व कोणी उकरून काढण्यास माणूस नाहीं म्हणून शेजाऱ्यास बोलावून सांगितलें कीं, एथें द्रव्य आहे तें तूं उकर आणि कांहीं मला दे व कांहीं तूं घे ते समयीं तो म्हणाला. ठीक आहे मी काढीन आणि मला जें चांगलें दिसेल तें मी तुला देईन तूं भांडूं नयेस तेव्हां ती त्याची गोष्ट सावकारानें कबूल केली नंतर शेजाऱ्यानें द्रव्य उकरून काढिलें आणि तें सर्व आपण घेऊन रिकामी भांडीं सावकारास दिलीं ते समयीं सावकार म्हणाला अरे सर्व द्रव्य तूं घेतोस आणि मला रे काय? तो म्हणाला तुला भांडीं द्यावीं हें मला चांगलें दिसलें सबब दिलीं तुझा करार हाच आहे तेव्हां काय करितो उगाच बसला शेजारी सर्व द्रव्य घेऊन निघोन गेला. नंतर अगदीं कंटाळला सबब कोठें दूरदेशीं जावें म्हणून निघाला—

आणि फिरत फिरत एका मोठ्या शहरांत आला व तेथें एका सावकाराचे घरीं बस्तीस राहिला तेवेळेस तेथील राजाकडे कांहीं रत्नें एका जव्हेऱ्यानें आणिलीं होतीं त्यांची किंमत होण्या करितां तीं बाजारांत पाठविलीं परंतु कोणी कांहीं कोणी कांहीं किंमत करीत परंतु त्याची वास्तविक किंमत काय ती होईना तेव्हां जव्हेरी राजास म्हणाला इतक्या पारख्यांनीं पाहिली परंतु त्यापैकीं कोणीच याचा परीक्षक नाहीं सबब आणखी सर्व सावकारांस दाखवून आणावयास राजानें आज्ञा केली तेव्हां हा सावकार जेथें उतरला होता त्याजकडे तीं रत्नें परीक्षे करितां आलीं तीं त्यानें पाहून म्हणाला तुह्मीं सर्वांनीं परीक्षा केली परंतु एकवार मला तीं दाखवाल तर मी ही त्यांची वास्तविक किंमत सांगेन असें म्हणतांच याजपाशीं तीं रत्नें आणून दिलीं याला रत्नाची पारख चांगली होती म्हणून यानें तत्काळ त्याची परीक्षा करून किमती सांगून दिल्या ते वेळेस तो जव्हेरी ही समजला कीं, याला याची पारख खरी आहे. मग तीं रत्नें राजानें खरेदी घेतलीं. नंतर तो घर बा-

ला सावकारास म्हणाला तुह्मीं येथें माझे गुमास्तगि-
रीवर रहावें ते समयीं ती त्याची गोष्ट यानें कबूल क-
रून तेथेंच राहिला इकडे याची स्त्री एकटीच घरीं रा-
हिली होती ती रूपानें फारच अप्रतिम व तरुण होती नि-
जकडे राजानें कुंटणी वगैरे पाठवून वश केली ती राजा-
स वश होतांच राजानें तिची उत्तम प्रकारें बरदास्त, दा-
सदासी भांडें कुंडें वगैरे इतमाम ठेविला कित्येक दि-
वस हा सावकार तेथें गुमास्तगिरी करून राहिला.
या मुळें त्या सावकारास व्यापारांत लक्षावधी रुपये-
नफा झाला. एक दिवस एक मोठें जहाज मालानें भ-
रलेलें येऊन त्या बंदरास लागलें ते वेळेस त्या जहा-
जावरील कप्तान म्हणाला जो कोणी उक्तें जहाज
खंडून घेईल त्यास देईन ते समयीं पुष्कळ व्यापारी-
बंदरांत गेले परंतु आंत माल काय भरला आहे हें तो
कप्तान सांगेना सबब कोणी व्यापारी तें घेण्यास ध-
जेनात हा गुमास्ताही बंदरांत गेला होता त्यानें तें पत-
करून जहाज पांच लक्ष रुपयांस उक्तें खरेदी घेतलें
ते समयीं दुसरे जे व्यापारी तेथें गेले होते त्यांनीं ये-

ऊन याचे धन्यास सांगितलें कीं, आज तुमच्या गुमा-
स्त्यानें एक जहाज त्यांत माल काय आहे किती आहे
व कोणते मासल्याचा आहे वगैरे कांहीं एक चोकशी
न करितां तुमचे नांवावर घेतलें आहे त्यांत बहुत क-
रून पुष्कळ तोटा येईल ते समयीं त्या सावकारास आ-
पले गुमास्त्या बद्दल खातर जमा होती म्हणून तो म्ह-
णाला काय व्यापारांत दोन तीन लक्ष रुपये तोटा येई-
ल जर आला तर करावयाचें काय आहे! आपले गु-
मास्त्यानें जो माल सही केला त्या करितां त्यानें जरी-
आपल्यास विकलें तरी विकून घेणें प्राप्त आहे. इकडे
गुमास्त्यानें तें जहाज उघडून पाहिलें तों त्यांत एकजा
त तांबें व हस्तिदंत भरला आहे. नंतर खुष झाला-
आणि तो माल काढून विकावयास आरंभ केला तो
दोन चार दिवसांत सारा माल खपून चार लक्ष रुप-
ये नफा झाला तो घेऊन घरीं आला आणि सावका-
रास तो मजकूर विदीत केला. ते समयीं सावकारानें
सांगितलें तूं आपले हिमतीवर रोजगार केलास त्या-
चा तो सर्व नफा तूंच घे आणि आपले घरीं निघून जा.

तेव्हां ती त्याची सत्यता पाहून त्यानें तें फार आनंदा-
नें मान्य केलें आणि त्या द्रव्याचा दुसरा कांहीं माल खरे-
दी घेऊन गाड्या भरल्या ते समयीं त्या सावकारानें त्या-
स एक बी दिली आणि सांगितलें कीं, या बी मध्यें अ-
शी करामत आहे कीं, जे वेळेस अन्न उदकाची पंचाई-
त पडेल ते वेळेस ही रुजत घालून पाणी लावावें म्ह-
णजे चार घटकेंत याचा वृक्ष होईल व त्याजला फळें
येतील तीं फार सुवासिक व मधुर, रुचिकर असून द-
हा पांच दिवस त्याच्या योगानें क्षुधा व तृषा लागत ना-
हीं व पुष्टी कारक आहेत आणि कार्य झालें म्हणजे-
त्याचे बुडांत दगडानें दोन चार ठोके मारावे म्हणजे-
भूमींत वृक्ष नाहींसा होईल. नंतर तेथें उकरून आप-
ली बी घेऊन मार्गानें जावें. आणि पुनः जेव्हां जेव्हां
गरज लागेल तेव्हा तेव्हां बी उपयोगीं पडेल परंतु अ-
शी बी तुजपाशीं आहे व तिची अशी करामत आहे ही
गोष्ट मात्र कोणाजवळ बोलूं नको कारण ही जर अग्नि
वर भाजली तर मात्र ह्या गूण तिजमध्यें रहाणार नाहीं.
यास्तव ही गोष्ट गुप्त ठेव हें याचें वर्म आहे असें सां-

गिनलें नंतर त्याची रजा घेऊन मजल दरमजल करीत येत आहे तों मार्गात पर्जन्याचे योगानें चिखल झाला होता त्यांत गाड्या रुपल्या कांहीं केल्यानें निघेनात ते समयीं सावकार जवळचे गांवांत गेला आणि तेथील गांवकरी यांस मदत करण्या करितां बोलाविलें ते समयीं ते म्हणाले आह्मी येऊन तुमचे गाड्यांतील माल उतरून बैल व गाड्या मोकळ्या करून देतों परंतु आह्मास फार गूळ घाल तर येऊं ते समयीं सावकारानें कबूल केलें तेव्हां त्या लोकांनीं गाड्यांवरचा माल काढून आणून चावडींत सांठविला आणि गाड्या व बैल गाळांतून काढून टाकिले नंतर सावकारा जवळ फार गूळ मागूं लागले तेव्हां त्यानें पुष्कळ गूळ खरेदी करून त्यांस दिला परंतु ते म्हणत हा फार गूळ नाहीं थोडा आहे आह्मास फार गूळ दिल्या वांचून आह्मीं तुह्मांस या मालास हात लावूं देणार नाहीं तेव्हां हजारों रुपयांचा गूळ खरेदी करून त्यांस दिला तरी ते म्हणाले हा कांहीं फार गूळ नाहीं, आह्मांस फार-गूळ दे आणि आपला माल ने तेसमयीं सावकार कं-

टाकून तो सर्व माल तेथें टाकून घरीं आला आणि प-
ह्यातो तों आपले घरीं दासदासी घोडीं पिढीं गडी मा-
णसें व संपदा बहून आहे ते समयीं तो आपले मनांत
सजला कीं, स्त्रीला कोठें तरीं द्रव्य सांपडलें त्यायोगें
करून हें कृत्य झालें असावें. नंतर घरांत गेला आणि
स्त्रीस विचारिता झाला कीं, इतकी संपदा कोठून प्रा-
प्त झाली. मी गेलों ते वेळेस तुला नेसावयास धड वस्त्र
ही नव्हतें ती म्हणाली मजला दृष्टांत असा झाला कीं,
माज घरांत पांच हांडे द्रव्य आहे तें उकर तेव्हां मी को-
णास नकळतां तें सर्व द्रव्य काढिलें आणि त्यावरच नि-
र्वाह करीत आहें हें ऐकून सावकार फारच खुष हो-
ऊन गेला नंतर रात्रीस उभयतांनीं सुख दुःखाच्या-
गोष्टी बोलून आनंदांत काळ घालविला त्या वेळेस बो-
लण्याचे सपाट्यांत भान न राहातां सावकारानें जी बी
बरोबर आणिली होती तिचें वर्तमान सांगून त्याची कृ-
ति ही करून दाखविली व म्हणाला ज्याणें ही मजला
दिली त्यानें असें सांगितलें आहे कीं, ही जर अग्नीव-
र भाजली तर हा गुण तिजमध्यें राहणार नाहीं या-

स्तव ही गोष्ट अगदीं गुप्त ठेव कोणाजवळ सांगूं न-
को यास्तव तुला सांगतों कीं, गोष्ट प्रसिद्ध करूंनको.
गुप्त ठेव ते समयीं स्त्री म्हणाली मी असें कसें करी-
न ही गोष्ट प्रसिद्ध केली असतां त्या पासून आप-
ल्यासच अपाय उत्पन्न होईल. सावकाराचे मनांत-
स्त्री विषयीं कपट मुळींच नवतें म्हणून भोळे पणानें
ही गोष्ट तिजला सांगितली दुसरे दिवशीं हा घरीं-
आल्याची बातमी राजास कळली तेव्हां राजानें कुं-
टणी हातीं निरोप पाठविला कीं, आता तुझी माझी
भेट कशी होईल हें कांहीं समजत नाहीं. आणि तु-
ज वांचून मला तर एक क्षणभर ही चैन पडत नाहीं.
याचा विचार कसा तो लवकर मजला कळीव साव-
काराचे स्त्रीची व राजाची फारच प्रीति जडून गेली-
होती म्हणून ती सावकार बाहेर कोठें कामा काजा-
स गेल्याच्या संधींत राजा कडे गेली आणि त्याजला
असें सांगितलें कीं, तुमचा व माझे भ्रताराचा स्ने-
ह पूर्वींचाच पुष्कळ आहे मध्यंतरीं भात्र तुटला आ-
हे परंतु तुम्हीं त्याला भेटीस बोलावून मोठे आदर-

सत्कारानें त्यास सभेंत मान द्यावा आणि बोलण्याचे चपेट्यांत अशी गोष्ट काढावी कीं, तुह्मांजवळ कांहीं चमत्कारिक एक बी आहे तिचा चार घटिकांत वृक्ष तयार होऊन उत्तम फळें उत्पन्न होतात असें ऐकण्यांत आहे ही गोष्ट मला खरी वाटत नाहीं तेव्हां तो म्हणेल कीं, गोष्ट खरी आहे तुह्मीं म्हणावें खोटी आहे जर ही गोष्ट तूं खरी करून दाखविलीस तर मी आपलें राज्य तुला देईन जर खोटी होईल तर तुझे घरांतील जी वस्तू प्रथम माझे हातास लागेल ती तूं मला द्यावीस असें बोलल्यावर त्याला त्याचे बी विषयीं पूर्ण भरवसा आहे म्हणून तो राज्य लोभानें कबूल करील मी ती बी भाजून ठेविली म्हणजे अर्थातच त्याचें बोलणें खोटें होईल. तंतर आपण आमचे घरीं या आणि प्रथम मलाच हातात धरा आणि घेऊन या म्हणजे झालें ही मसलत राजाचे विचारास आली. तंतर दुसरे दिवशीं राजानें सावकारास बोलावून आणून बी विषयीं गोष्ट काढिली आणि त्या विषयीं चें बोलणें बरेंच झालें शेवटीं वर सांगितल्या प्रमाणें प्रतिज्ञा ठर-

ली नंतर घरीं आला तों त्या छिनालीनें बी भाजून ठे-
विली ही गोष्ट सावकारास माहीत नवती दुसरे दिवशीं
बी घेऊन सावकार राजाकडे गेला. आणि रुजत घालू-
न परवालीच्या परवाली पाणी ओतलें परंतु तिला मो-
ड आला नाहीं ते समयीं राजा म्हणाला कसें काय?
तुमची प्रतिज्ञा असत्य झाली कीं नाहीं मला पूर्वींच मा-
हित होतें कीं, असा अद्भुत चमत्कार मानवांचे हातून
कधींही व्हावयाचा नाहीं. उगाच लोकांत गप्पा मारतां-
आतां कसें ते समयीं सावकार अधोमुख होऊन आ-
पले घरीं आला. दुसरे दिवशीं राजा आपले घरीं येऊन
काय वस्तू घेऊन जातो कोण जाणे याचिंतेत पडला-
ते समयीं विचार करूं लागला कीं, या बी विषयीं मी को-
णाजवळ कधीं ही भाषण केलें नाहीं फक्त स्त्रीजवळ
मात्र बोललों होतों बी मध्यें जर तसा गुण नाहीं म्ह-
णावा तर आपण एक दोन वेळ अनुभव ही घेतला-
होता या वरून त्याचे मनांत आलें कीं, माझी स्त्री-
राजास अनुकूल होऊन त्या उभयतांचें मन मिळालें
आहे व ही सर्व दौलत त्यानेंच दिली असावी व आ-

तां आपले घरीं राजा आला म्हणजे बहून करून स्त्री-
स हातीं धरून घेऊन जाईल यांत संशय नाहीं.आतां का-
य करावें म्हणून विवंचना करीत बसला आहे हें समोर
जो गोष्टी सांगून तीन लाख रुपये घेतलेला शिपाई या-
चे वाड्या समोर रहात होता त्यानें यास पाहिलें तों हा -
अगदीं तेजहीन चिंताक्रांत बसला आहे म्हणून तो सा-
वकारा जवळ आला आणि म्हणाला महाराज तुह्मीं आ-
ज इतके चिंताग्रस्त कां झालांत तुह्मांस असें कोणतें सं-
कट प्राप्त झालें आहे त्याचें बोलणें ऐकून सावकाराचे-
तळव्याची आग मस्तकास गेली आणि म्हणाला काय-
पुसतोस तुझ्या तीन गोष्टी जर मी ऐकिल्या नसत्या तर
अशा विपत्ती स कां पात्र झालों असतों परंतु होणारे -
गोष्टीस उपाय नाहीं जें माझे शक्तनीं ब्रह्मदेवानें लिहि-
लें होतें त्याप्रमाणें घडलें. शिपाई म्हणाला असो मी-
तीन लाख रुपये घेतले याचें जर तुह्मास फार दुःख वा-
टत असेल तर ते मी तुमचे परत देतों.परंतु तुह्मास को-
णतें संकट प्राप्त झालें आहे तें विश्वासानें सांगा. जर-
मला कांहीं अक्कल सुचली तर तुह्मां स त्या चिंते पासून-

ळें करीन. ते समयीं त्यानें अव्वल पासून अखेर प-
र्यंत सर्व मजकूर निवेदन केला. ते समयीं शिपाई म्ह-
णाला इतेंच ना कांहीं चिंता नाहीं. यांतून मी तुह्मास
पार पाडून देतों चला राजाकडे असें म्हणून राजा क-
डे गेला आणि राजास म्हणाला महाराज, या साव-
काराचे घरांत कांहीं द्रव्य होतें तें अमूक मनुष्यानें
काढून नेलें आहे यास्तव याचा न्याय करून जें खरें
दिसेल तसें करावें ते समयीं राजानें शेजाऱ्यास बो-
लावून आणून विचारिलें तेव्हां तो म्हणाला महारा-
ज याचा माझा करार असा झाला आहे कीं, मी द्रव्य
काढावें आणि जें मला चांगलें दिसेल तें मी यांस द्या-
वें त्याप्रमाणें केलें. आतां मजकडे काय आहे? शिपा
ई म्हणाला राजा याला द्रव्य चांगलें दिसलें म्हणून या-
णें तें आपले घरीं नेलें यास्तव तें द्रव्य सावकारास
देऊन रिकामीं भांडीं शेजाऱ्यास द्यावीं हें योग्य आ-
हे तें सर्वानुमतें वास्तवीक ठरलें सबब राजानें शेजा-
ऱ्याचें सर्व घरदार जप्त करून तें संपूर्ण द्रव्य सावका-
रास देवविलें. नंतर सावकारास बरोबर घेऊन जे-

थें फार गुळा करितां माल अडकून पडला होता तेथें आ-
ला आणि बाजारांत जाऊन तीन पैशांचा गूळ आणि-
ला तो एक पैशाचा एक ठिकाणीं व दोन पैशांचा एकठि-
काणीं असे निरनिराळे ठेविले आणि त्या गांवकऱ्यांस
म्हणाला तुह्मांस यांज पासून काय घ्यावयाचें आहे?
ते म्हणाले फारगूळ तेसमयीं तो म्हणाला या दोन रा-
शी करून ठेविल्या आहेत यांतून जो फार गूळ असेल
तो तुह्मीं घ्यावा. ते म्हणाले पूर्वीं या सावकारानें हजारों
रुपयांचा गूळ खरेदी केला होता तरी आमचे फार गु-
ळाची भरती झाली नवती आणि आतां तूं दोन पैशां-
चा गूळ देऊन समजूत करितोस कीं काय? दोन पैशानें
फार गूळ कसा होईल तेसमयीं उभयतां उठोन तेथी-
ल अधिकारी याजकडे गेले आणि तो मजकूर निवेद
न केला. तेसमयीं त्यानें गांवकरी यांस बोलावून आ-
णून त्यांस विचारितां फार गूळ देण्याचा याचा आम-
चा करार आहे तो यानें देऊन आपला माल घेऊन जा-
वा तेसमयीं अधिकाऱ्यास ही आश्चर्य वाटलें आणि-
त्यानें त्यांच्या पुढें दोन्ही खडे ठेविले त्यांत फार गूळ को-

णाता म्हणून विचारिलें तेव्हां सर्व म्हणाले दोन पैशां
चा हा फार गूळ ते समयीं अधिकाऱ्यानें त्यांस आज्ञा के-
ली कीं हा फार गूळ तुह्मीं घ्या आणि सावकाराचा माल
सावकाराचे स्वाधीन करा नाहीं पेक्षां तुह्मास शासन क-
रीन हा तुमचा न्याय योग्य झाला आहे तेव्हां ते काय-
करितात माल देणें प्राप्त सावकारानें तो सर्वमाल घेऊन
शिपाया सहवर्तमान आपले घरीं आला. तंतर साव-
कार फारच खुष होऊन गेला. शिपाई म्हणाला आतां-
तुह्मांस राजाची प्रतिज्ञा मात्र शेवटास नेण्याची काळ-
जी राहिली आहे तर उद्यीक राजास बोलाव आणि
असें कर कीं, तूं आपले बायकोस माडीवर बसवून-
तेथें जाण्यास शिडी लाव आणि सर्व जिने वगैरे बंद
कर मग तो बायको कशी नेतो तें पाहूं ? ते समयीं त्या-
प्रमाणें तजवीज करून सावकारानें राजास बोला-
वूं पाठविलें ते समयीं राजा प्राप्त झाला असतां शि-
पाई म्हणाला महाराज, आपली काय प्रतिज्ञा झाली
होती तिचा एकवार आपले मुखानें उच्चार करावा हें
ऐकून राजा म्हणाला बी जर रुझोन त्याजवर चार-

घरकेंत फळें आलीं तर सर्व राज्य तुला देईन आणि जर असत्य झालें तर त्याचे घरांतील जी वस्तु प्रथम- माझे हातास लागेल ती मी घ्यावी. अशी प्रतिज्ञा झाली होती त्या प्रमाणें ती बी मुळींच रुझली नाहीं सबब मी- येथें आलों आतां याचे घरांतील जी प्रथम वस्तु माझे हातास लागेल ती मी नेईन ते समयीं शिपाई म्हणाला ठीक आहे जी तुह्मांस पाहिजे ती वस्तु प्रतिज्ञे प्रमाणें- घ्यावी. नंतर राजा इकडे तिकडे सावकाराचे स्त्रीस पा- हूं लागला तों ती वर खिडकींत बसली आहे असें पा- हून शिडीवर चढावयास लागला ते समयीं प्रथम- शिडी हातास लागली. म्हणून शिपाई विनय पूर्वक म्हणाला महाराज, खालीं उतरावें वर कोठें तिकडे- जातां प्रथम तुमचे हातास शिडी लागली ती आपली घेऊन जावी. वर चढण्याचें कारण नाहीं. ते समयीं रा- जा आपले मनांत अगदीं खिन्न होऊन अधोवदन- मुद्रा टयानें चालता झाला. या प्रमाणें सर्व संकटांतून शिपायानें सावकारास मोकळें केलें आणि म्हणाला आतां माझ्या गोष्टी तुझ्या अनुभवास कांहीं आल्या

नसल्यास तुझे तीन लक्ष रुपयेच काय परंतु आतांजी माझे घरांत दौलत आहे ती सर्व अथवा त्यांतून जितकें तुला पाहिजे तितकें द्रव्य घेऊन जा ते समयीं सावकार म्हणाला आज तुझा उपकार मी आपले मुखानें काय- वर्णन करूं परंतु मी अगदीं या दुनयेंतून उठलों होतों तें तूं मला आज माणसांत घातलेंस तस्मात् हें सर्वद्र- व्य व मी तुझा आहें. तुला पाहिजे तशी याची व्यवस्था कर. ते समयीं शिपायास ही मोठा संतोष झाला आ- णि त्या दिवसा पासून तो सावकार शिपायाचे विचा- रें वर्तणूक करिता झाला.

## कथा १८वी.

### मूर्ख कुटुंबाची.

वाई क्षेत्रांत एक ब्राह्मण रहात होता त्याचे ना- तवास कांहीं आजार झाला म्हणून वैद्याकडे गेला. आ- णि त्यास आपले घरीं बोलावून आणून मुलास दाखवि ता झाला ते समयीं वैद्य म्हणाला मी औषध देतों परं- तु थोडें कडू आहे व पथ्याचा बंदोबस्त चांगला ठेवि-

त्या पाहिजे तर हा मुलगा लौकर बरा होईल. ते सम-
यीं मुलाची आई व बाप म्हणालीं तो हट्टी आहे पथ्य
तर करावयाचा नाहींच तें मी करीन परंतु कडू औषध
तो पिणार नाहीं ते समयीं त्या ब्राह्मणाची बायको म्ह-
णजे मुलाची आजी जवळ होती ती म्हणाली तें काम
मी पतकरलें परंतु एकदां भाऊराया बरा होऊंद्या. ते-
व्हां मुलाचा बाप म्हणाला औषध मी घेईन परंतु पथ्या-
चीच पंचाईत आहे कारण आह्मास बापलेकांस कोठें
भट व आमचे मातोश्रीस व कुटुंबास सवाशीण जावें
लागतें यामुळें पथ्य होणें कठीण तेव्हां मुलाचे बापा
ची आत विधवा होती तीही जवळच होती ती म्हणा-
ली मला तर कोठें भोजनास जावें लागत नाहींना? तु-
म्ही कोणी तरी औषध घ्या आणि मी पथ्य करित्यें या-
प्रमाणे तीं सर्व मनुष्यें आप आपसांत शंका व निराक-
रणें करावयास लागलीं ते समयीं वैद्यास मोठें आ-
श्चर्य वाटलें आणि मनांत म्हणतो काय या घरचीं सा-
रींच माणसें वेडीं आहेत काय? वेडीं म्हणावीं तर हे-
बाप लेक चांगले भिक्षुक आहेत व यांच्या स्त्रिया ही-

चांगल्या शाहाण्या दिसतात व आजारी मुलगा कु-
ढू औषध घेणार नाहीं म्हणतात तोही चवदा पंधरा व-
र्षांचा आहे तेव्हां कसें असेल तें असो. म्हणून त्यास
म्हणाला तुह्मीं इतके पंचाइतींत पडूं नका औषध मी-
घेतों व पथ्य ही मीच करितों म्हणजे तुमचा भाऊराया
बरा होईल असें त्यांनीं तें वैद्याचें बोलणें ऐकून ते-
सारेच आनंद युक्त झाले. नंतर वैद्य उठोन आपले घ-
रीं चालता झाला. तात्पर्य:- पढत मूर्ख.

## कथा १७वी.

### एका जादुगार स्त्रीची.

एक शिपाई रानांत शिकारी करितां चालला.
होता त्याला अरण्यांत एक वृद्ध स्त्री भेटली तिजपा-
शीं भक्ष कांहीं नवतें म्हणून यास म्हणाली मला फा-
र क्षुधा लागली आहे जर कांहीं खावयास देशील
तर फार उपकार होतील. असें त्या वृद्धेचें भाषण ऐ-
कून शिपायानें आपले जवळचे कांहीं भक्ष्य पदार्थ
तिला दिले ते घेऊन तिनें खाल्लु आणि संतुष्ट होऊ-

न म्हणाली आतां तूं या मार्गानें नीट जा म्हणजे पुढें जवळच एक झाड तुझे दृष्टीस पडेल त्या झाडावर नऊ-पक्षी आहेत त्यांजपाशीं एक घोंगडी आहे ती कोणी घ्यावी या विषयीं त्यांचा आपसांत वाद लागला आहे. यास्तव आपले बंदुकींत छरे भरून त्यांजवर उडीव-म्हणजे त्या पैकीं आठ पक्षी उडोन जातील व एक मरू-न पडेल नंतर तूं त्याचें काळीज काढून भक्षण कर म्ह-णजे त्या योगानें नित्यशः प्रातः तुझे उशाजवळ एक मोहोर उत्पन्न होईल व जी घोंगडी सांपडेल तिजम-ध्यें अशी करामत आहे कीं, तिजवर बसून कितीही दूर जावयाचें असलें तथापि त्या स्थळाचें चिंतन केलें म्ह-णजे अल्पावकाशांत तेथें जाऊन पोंचशील हें ऐकून शिपाई आपले मनांत म्हणतो ही वृद्ध स्त्री सांगते अ-सें जर घडोन येईल तर आज आपलें प्रारब्धच उघ-डल्या सारखें होईल. नंतर तो तेथून निघून शंभर क-दम चालून गेला नाहीं तों एक झाड त्याचे दृष्टीस प-डलें व त्याजवर पक्षी बसले होते त्यांजवर वृद्धेनें-सांगितल्या प्रमाणें बंदूक सोडिली तों आठ पक्षी उडा-

न गेले व एक मरून खालीं पडला तदनंतर त्यानें त्या-
चें काळीज काढून भक्षण केलें व घोंगडी घेऊन आ-
पले घरीं आला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं निजून उ-
ठला तों एक मोहोर उशाजवळ पडली आहे ह्या चम-
त्कार पाहून तो शिपाई आपले मनांत चालं बा ल खू-
ष होऊन गेला. दररोज एक मोहोर मिळूं लागली.-
यामुळें तो थोडे दिवसांत चांगला सधन होऊन गेला
नंतर त्याला असें वाटलें कीं, देश पाहण्यास जावें म्ह-
णून फिरावयास निघाला. तो फिरत फिरत एके कि-
ल्ल्यांत गेला तों त्या ठिकाणीं एक वृद्ध स्त्री जादूगार
होती तिनें त्याला पहातांच आपले जादूचे योगानें
याचे जवळ घोंगडी आहे व यानें त्या पक्ष्याचें काळी-
ज भक्षण केलें हें जाणलें नंतर तिची एक कन्या फा-
रच रूपवान् व तरुण होती ती त्या मुशाफराकडे पा-
ठविली त्यानें तिजला अवलोकन करतांच अगदीं-
मोहित होऊन गेला, ते समयीं तिनें नेत्र संकेतानें इ-
शारा करतांच हा उठून तिचे पाठी मागें जादुगार स्त्री-
चे घरीं गेला नंतर त्या उभयतांची फारच प्रीति जड-

ली दिवसें दिवस भगदीं वेडा होऊन गेला. आधींच-
नी जादुगारणीची कन्या त्यांतून तिला आईचें सांग-
णें मग त्या कामास आळस कधींच होणार नाहीं ति-
णें त्याचें मन मोहून टाकिलें. नंतर त्या वृद्धेस याचे
पोटांतील तें पक्ष्याचें काळीज काढून घेण्याची युक्ती
माहीत होती त्या प्रमाणें ती जिन्नस कन्येचे हातून
त्याजला चारविली मग त्यास निद्रे मध्यें वमन झा-
लें त्या वमनांत तें काळीज बाहेर आलें ते समयीं-
तिनें तें काढून घेऊन आपले मातो श्री जवळ दिलें ति-
नें तें आपले कन्येस तत्काळ खावयास सांगितलें-
त्या योगानें दररोज मोहोर मिळूं लागली परंतु तेव-
ढ्यानें ती वृद्धा संतोष पावली नाहीं ती घोंगडी हरण-
करण्याची तृषा होती म्हणून कन्येस सांगितलें कीं,
ती घोंगडी त्याजपासून कोणते ही युक्तीनें हरण क-
र, नाहीं पेक्षां तुला मी ठार मारून टाकीन तेव्हां ति-
नें शिपायास एकांतीं सांगितलें कीं, काय करावें ए-
का बेटांत एक पर्वत आहे त्याजवर अतिशय द्रव्य-
आहे परंतु ठिकाण येथून फारच लांब आहे तेथें-

मनुष्याची जाण्याची गती नाहीं. जर त्या ठिकाणीं-
आपलें जाणें होईल तर द्रव्यास कांहीं कमी नाहीं,
ते समयीं शिपाई म्हणाला तें माझें काम अर्ध घट-
केंत मी तुला घेऊन तेथें जातों अशी चमत्कारीक-
वस्तु मजपाशीं आहे. नंतर त्यानें ती घोंगडी आंथ-
रली आणि उभयतां त्याजवर बसलीं व त्या पर्वता-
चें चिंतन केलें तों इतक्यांत हीं उभयतां त्या पर्वताव-
र जाऊन पोंचलीं आणि पहातात तों आपण मो-
ठे अरण्यांत एका पर्वतावर उभीं आहों नंतर ते-
थें पुष्कळ द्रव्य सांपडलें तें घेऊन एकदिवस तेथें
च रहाण्याचा निश्चय केला आणि आपले बरोबर
कांहीं अमली पदार्थ आणिला होता तो शिपायास वि
ड्यांत चारला तेव्हां तत्काळ त्यास निद्रा प्राप्त झाली
इतक्यांत त्या जादुगरणीचे कन्येनें त्याजला घोंगडी
बाहेर ठेवून आपण घोंगडीवर बसली आणि आ-
पले स्थलाची कल्पना केली तों ती तेथून आपले-
आई जवळ येऊन स्वरक्षीत पोंचली इकडे तें अर-
ण्य राक्षसांचें होतें हा जागृत होऊन पहातो तों तीन

राक्षस याचे दृष्टीस पडले ते सगळीं यास पाहून ते आपसांत कोणी म्हणतात यास सगळा खावा कोणी म्हणतात भाजून खावा हे शब्द याच्या कानीं पडतांच हा भ्याला ते वेळेस पुढें काय करावें हें त्यास कांहींच सुचेना इतक्यांत एक राक्षस म्हणाला जाऊंद्या गरीबास कशास मारावा. नंतर त्यांनीं शिपायास ज्यादूच्या योगानें तेथून उडविला तो एका बागेंत टाकिला हा पहातो तों ते राक्षस व तें अरण्य नसोन आपण एका बागेंत आहों त्या बागेंत दुसरें कांहींच भक्ष्य पदार्थ नव्हते फक्त कोबीचे कांदे मात्र तेथें होते. शिपायाला क्षुधा फारलागली होती. म्हणून त्या पैकीं एक कांदा काढून त्यांतील थोडासाच भक्षण केला. तों त्याची अवस्था अगदीं वेगळी होऊन गेली ती अशी कीं, जे त्याचे हात होते त्याचे पायझाले व डोकें लांब झालें तसेच कानही लांब झाले. याप्रकारें होऊन तो गाढव बनला. नंतर फार विचारांत पडला परंतु करतो काय इतकें झालें परंतु त्याची क्षुधा शांत झाली नव्हती म्हणून त्यानें जाऊन आणखी एक कोबीचा-

कांद्या भक्षण केला, तो त्यालांत पुनः पूर्ववत मनुष्य झाला. तेसमयीं शिपाई आपले मनांत समजला कीं, या कोबीचे कांद्यांत दोन प्रकारचे कांदे आहेत. नंतर त्यां पैकीं एकेक कांदा घेतला आणि त्या किल्ल्याकडे जाण्यास निघाला तो दोन तीन दिवसांत त्या किल्ल्या नजीक येऊन पोंचला नंतर त्यानें आपला वेष बदलून दुसरे कांहीं चमत्कारिक रीतीचा पोषाख केला तो असा कीं, त्या वेळेस त्याची आई जरी त्याला पहाती तरी तिनें त्यास ओळखलें नसतें असा त्या किल्ल्याचे दरवाजा जवळ आला आणि दारावर थाप मारली तों त्या जादुगर वृद्धेनें कोण आहे म्हणून विचारिलें ते समयीं शिपाई म्हणाला मजला राजानें उत्कृष्ट कोबीचे कांदे आणावयाकरितां आज कित्येक दिवस पाठविलें होतें तो मी पृथ्वीभर फिरोन ते कांदे घेऊन आलों आहें. तेसमयीं तिनें दरवाजा उघडून त्यास आंत घेतलें नंतर ती वृद्धा म्हणाली त्यां तून जर थोडा अंश मला देशील तर मोठे उपकार होतील. तेसमयीं त्यानें त्यांतील थोडा कांदा कापून

तिजला दिला तिनें तत्काळ तो चिरून शिजविला आणि त्याचे तीन भाग केले आणि एक भाग आपण भक्षण केला तो खातांच ती वृद्धा गर्दभी झाली. आणि उड्या मारीत तबेल्याचे कडेस जाऊन उभी राहिली. नंतर तिचे घरीं कामकाज करणारी दुसरी एक स्त्री बाहेर कोठें काम काजास गेली होती ती आली तिनें दोन भाग करून ठेविले होते त्यांतून एक खाल्ला तों तीही तशीच गर्दभी होऊन वृद्धेजवळ जाऊन उभी राहिली. नंतर घटकेचे अवकाशानें वृद्धेची कन्या घरांत आली तिनें तो तिसरा भाग राहिलेला भक्षण केला तिघीही गाढवी झाल्या. नंतर शिपायानें तिघींचे गळ्यास दोरी लावून एक दळणाचा कारखाना होता तेथें घेऊन गेला आणि त्या तिघी गाढवी त्या कारखानेवाल्यास अल्प किमतीस विकल्या. नंतर तेथून निघून येते समयीं त्यास म्हणाला या पैकीं जी वृद्धा आहे तिला दिवसांतून एकवेळ खाण्यास घालून तीन वेळ फटके मारावे व दुसरीला तीन वेळ खाण्यास घालून एक वेळ फटके मार व तिसरी जी

लहान आहे हिला तीन वेळ खाण्यास घालावें हि-
ला मात्र फटके मारूं नये म्हणजे यांचे हातून तुझी
नोकरी चांगली होईल. यांत जर तूं चुकलास तर-
मात्र यांचे हातून तुझी नोकरी बरोबर होणार ना-
हीं असें सांगून तेथून निघाला तो त्या स्त्रिचे घरीं
तीन दिवस वस्तीस राहिला. नंतर तिसरे दिवशीं
त्या दळणाचे कारखान्यांत गेला तों त्या कारखाने-
वाल्यानें सांगितलें कीं, तीन गाढवी पैकीं जी स्त्र-
होती मरण पावली दोन मात्र जिवंत आहेत परंतु-
त्या अगदीं मरणोन्मुख झाल्या आहेत यास्तव तुला
पाहिजे तर घेऊन जा त्या माझे कांहीं कामाच्या उप-
योगीं नाहींत माझें काम फार मेहनतीचें आहे तें-
त्यांच्यानें होत नाहीं असें ऐकून शिपायानें दोघींस
घरीं आणिलें आणि दुसरा कांदा चिरून पुनः त्यांस
पूर्ववत स्त्रिया केल्या ते समयीं ती तरुण स्त्री म्ह-
णाली मी आज पर्यंत जीं कृत्यें केलीं तो माझा दोष
नाहीं मी आपले आईचे सांगण्या वरून केलीं या-
स्तव ते सर्व अपराध मला क्षमा कर तुझी घोंगडी-

घरांत लपवून ठेविली आहे ती तुझी तुला देतें व जें पक्ष्याचें काळीज मी भक्षण केलें आहे तें पुनः काढून तुझें तुला देण्याची हुन्नर मला माहित आहे त्यायोगें तें काढून तुझें तुला देतें ते समयीं शिपाई म्हणाला ज्या पक्षीं मी तुला आपली बायको करणार त्यापक्षीं तें काळीज तुजपाशीं असलें म्हणून हरकत नाहीं ती घोंगडी मात्र माझी मला दे ते समयीं तिनें तत्क्षणीं आणून त्याचे स्वाधीन केली. नंतर त्या शिपायानें निजबरोबर लग्न केलें आणि उभयतां मोठे आनंदानें काळ घालवितीं झालीं.

## कथा १८वी.

### चोराने कसबाची.

एके दिवशीं एक गृहस्थ आपले बागेंत कांहीं झाडें लावीत होता त्याच्या जवळ दुसरा एक तरुण मनुष्य आला आणि त्यास सलाम करून म्हणाला बाबा, तूं सुखी आहेसना? त्यानें त्यास तूं कोठील कोण म्हणून विचारिलें ते समयीं तरुण म्हणाला मी अ-

सा भटकत पृथ्वी पर्यटन करणारा आहें असें सां-
गोन वृद्ध पुरुषास म्हणाला तुला मुलेंबाळें कायआ-
हेत तो म्हणाला भस्कन मला पुत्र अथवा कन्या को-
णी नाहीं एक मुलगा होता तो फार दुर्गुणी निघाल्या-
मुळें मी त्यास रागें भरत होतों म्हणून तो घरांतून प-
ळोन गेला. तरुण म्हणाला दुर्गुणी म्हणतोस तर असा
घालवून देण्या जोगा त्याचे अंगांत कोणता दुर्गुण हो-
ता वृद्ध पुरुष म्हणाला तो नित्यशः चोरी करीत असे
त्याजला पुष्कळ तऱ्हेनें मी व माझ्या बायकोनें शिक-
विलें परंतु तो आपली ती वाईट खोड टाकीना म्हणू-
न मला फारराग आला आणि मी त्यास रागें भरलों.
तरुण म्हणाला आतां तूं या झाडाजवळ काठ्या पु-
रून यांस कांहीं झाडें बांधितोस व कांहीं बांधीत ना-
हींस याचें कारण काय?वृद्ध म्हणाला बाग कशी करा-
वी हें अजून तुला माहित नाहीं हें जर तूं शिकशील
तर कां बांधावीं व कां बांधूंनये हें तुला समजेल. तरु-
ण म्हणाला खरी गोष्ट आहे पण आतां कृपाकरून
माझे प्रश्नाचें उत्तर दे म्हणजे हा विषय मजला समजेल.

आणि त्या योगानें मला आनंद होईल. वृद्ध म्हणाला - जीं झाडें लहान आहेत तीं हवीं तशीं वळतील परंतु जीं जून झालीं आहेत तीं आतां हवीं तशीं वळूं सकणार नाहींत. म्हणून मी त्यांस बांधीत नाहीं. तरुण म्हणाला. तूं तीं बांधून वांकडीं न होऊं देतां सरळ करूंस कतोस तसें आपले पुत्रास तो लहान असतां जर चांगलें शिकविलें असतेंस तर तो तुजपासून पळून गेला नसता आतां तर तो फारच दुर्गुणी झाला असेल. वृद्ध म्हणाला कदाचित् चांगला ही झाला असेल तरुण म्हणाला आतां जर तूं त्याला पाहिलास तर ओळखशील काय? वृद्ध म्हणाला फार दिवस झाले म्हणून आतां मी त्याला ओळखणार नाहीं खरा पण त्याचे दंडावर एक वाटाण्या एवढा तिळ आहे तो जर माझे दृष्टीस पडला तर मात्र ओळखीन तरुण मनुष्यानें आपला आंगरखा काढून दंड उघडा करून दाखविला. तो तीळ त्याणें पाहिल्यावर म्हणाला तुझे दंडावर तिळ आहे खरा परंतु तूं तर मोठा चांगला श्रीमान् दिसतोस जर तूं माझा मुलगा खरा आहेस तर तुला इतकें वैभव कशानें प्राप्त झालें तरुण-

म्हणाला मी केवळ चोरांचा नाईक म्हणजे गुरू आहें. मी मोठे श्रीमाना शिवाय गरीब गुरीबांची चोरी करीत नाहीं मला जर सामर्थ्य असलें तर ते गरीब गुरीब माझे आश्रयानें असतात व मला जर कोणी कांहीं दिलें तर तें माझे कसबाचे सात्यानेनें मिळविलेलें नसेल तर तें मी कधींही घेणार नाहीं. त्यांत थोडें तरी माझें कसब असलें पाहिजे वृद्ध म्हणाला तूं कितीजरी बढाई सांगितलीस तरी चोर तो चोर त्याचा परिणाम कधींही चांगला होणार नाहीं, पण तुझा काका एथें हकम आहे त्याला जर ही तुझी गोष्ट कळली तर तो तुला एथें राहूं देणार नाहीं तरुण म्हणाला मी तर त्याला भेटून आपलें सर्व वर्तमान कळविणार आहें मग तो काय करतो पाहूं. या प्रमाणें बोलणी झाल्यावर ते उभयतां घरीं गेले. नंतर हा तरुण आपले आईस भेटला ते समयीं तिचे नेत्रांस पूर्वींची एक पुत्र विरहाची धार लागली होती त्याला पाहून दुसरी आनंदाश्रूची धार लागली. नंतर त्या सर्वांनीं मोठे आनंदानें भोजन केलें. दुसरे दिवशीं तरुण मनुष्य उठोन आपले चुलत्याकडे गेला आणि मी अमक्या

चा अमुक असें सांगून म्हणाला मी चोरांचा केवळ गुरू आहें तुलना म्हणाला तूं चोरांचा गुरु म्हणविनोस त्या पेक्षां तुला मी तीन कामें सांगतों तीं जर तूं बजाविलींस तर तुला एथें राहूं देईन नाहीं पेक्षां हांकून लावीन, तरुण म्हणाला तीं कोणतीं कामें आहेत तें मला सांग हकम म्हणाला तीं अशीं कीं, माझे पागेंतील घोडा तूं चोरून न्यावास, दुसरें माझे बिछान्यावर जी चादर माझे आंगाखालीं आहे ती चोरून न्यावी, तिसरें यागांवचे मोठे देवळांत जो काजी आहे त्यास तूं चोरून न्यावास हीं तीन कामें जर तूं बजावशील तर मात्र तूं चोरांचा गुरु आहेस खरा असें मी समजेन ते समयीं तरुण मनुष्य म्हणाला फार उत्तम आहे. हीं कामें मी बजाऊन देतों असें म्हणून निघून आला. इकडे हकमानें आपले घोड्यावर सरंजाम ठेवून त्याजवर एक शिपाई बसविला व घोड्याचे लगामास दोरी बांधून ती एका शिपायाचे हातीं देऊन त्याजला घोड्या पुढें उभा केला दोन शिपाई घोड्याच्या दोन बाजूस उभे ठेविले शिवाय बाहेर व आंत व पागे सभोंवती कट्टा पाहारा ठेविला नंतर आप-

ण आपले घरीं गेला. इकडे त्या तरुण मनुष्यानें उत्तम प्रकारचे अलंकार आंगावर घालून स्त्रीचा वेष धारण केला आणि दारूच्या कुप्या खरेदी करून दारू विका वयाचे निमित्तें हुकमाचे पागेजवळ येऊन उभा राहिला ते समयीं ती उत्तम स्त्री दिसों लागली म्हणून दरवाजा तील पहारेकरी याचे जवळ येऊन लाडीगोडी लावून दारू मागूं लागले त्या वेळेस त्या चोरानें त्यांजला ती उत्तम दारू विपुल पाजली तेणें करून त्या सर्वांस निशा आली नंतर आंत गेला तों घोड्याची वर सांगितलेली अवस्था पाहून फार घाबरला परंतु त्यानें आपले नशीबावर-हवाला ठेवून बेधडक आंत गेला ते समयीं रूपवान व तरुण स्त्रीला दरडावून प्रतिबंध करील असा पुरुष-कोण आहे तशांत इजपाशीं दारू तीही दारू सर्वांस अति प्रियकर या मुळें चोराचें कार्य सिद्ध होण्यास फार सा श्रम पडला नाहीं. आंत गेल्या बरोबर चोहीं कडून-चौघे तिचे जवळ जमले आणि तिची फार नम्र पणा-नें विनवणी करून दारू मागूं लागले त्यानें आपलें कार्य झालें अशी खूण गांठ बांधून त्या सर्वांस यथेच्छ स

रा दिली त्यानीं ही फुकट पाहिली मग आळस कोणक-
रितो हवी तितकी प्याल्यावर प्याले झोंकले. तंतर नि-
शा आली ते समर्थी जागचे जागीं पडले परंतु घोड्या-
वर जो शिपाई होता तो तसाच वर राहिला त्याजला खा-
लीं उतरावा तर कदाचित आरडा ओरडा करील हें भय-
ते समर्थी चोरानें अशी हिकमत केली कीं, घोडा ज्या ठि-
काणीं उभा होता त्याचे पोटाखालचा तंग मोकळा करू-
न जीताचे आंतील बाजूनें दोन चांगल्या मजबूत रश्शा
घातल्या आणि त्यांचीं टोंकें वरील इमारतीचे वाह्याला-
स अडकावून दिलीं, जसा कायतो शिपाई घोड्यावरच
बसला आहे, मग हळूच त्याचे खालचा घोडा काढून घे-
तला आणि चालता झाला तो घरीं येऊन घोडा बांधून
ठेविला आणि निद्रा करिता झाला इकडे हकम अपरा-
त्रीं उठला आणि काय हवाल आहे म्हणून पाहाण्याक-
रितां पागेंत गेला तों सर्व पहारे करी एक सारिखे घोर-
त पडले आहेत मग जेथें घोडा बांधला होता तेथें आ-
ला आणि तेथील शिपाई ही त्याच प्रमाणें आप आपले
पहाऱ्यावर निशेंत चूर होऊन पडले आहेत. घोडा मात्र

जाग्यावर नाहीं तेव्हां तो खिन्न होत्साता माघारा आला. नंतर दुसरे दिवशीं पहांटेस घोडा घेऊन चोर हकमाचे घरीं गेला आणि म्हणाला हा तुमचा घोडा सांभाळा ते समयीं हकम म्हणाला तूं प्रतिज्ञे प्रमाणें कामगिरी तर बजाविलीस परंतु कोणते हिकमतीनें घोडा कसा घेऊन गेलास तें सांग. ते समयीं झालेला मजकूर चोरानें निवेदन केला तेव्हां हकम म्हणाला झालें तें बरेंच झालें. परंतु दुसरी कामगिरी करावी ते समयीं चोरानें हकमाची रजा घेऊन घरीं आला आणि दुसरे दिवशीं रात्रीस श्मशानांतून ताजा मुर्दा उकरून हकमाचे भिंती वरून चढून गच्चीवर आला आणि तेथें त्याचे निजावयाचे खोली समोरचे बाजूस एक खिडकी होती त्यांतून पाहातो तों हकम आपले हातांत बंदूक घेऊन बिच्छान्यावर बसला आहे ते समयीं चोरानें मुर्द्याची मान खिडकीचे तोंडांत ठेविली ते समयीं हकम समजलाकीं, चोर आला म्हणून त्यानें आपले हातांतील बंदूक सोडली ती गोळी त्या प्रेतास लागतांच प्रेत आंत टाकून दिलें आणि त्याचे बरोबर आपणही उडी

टाकून आंत गेला तेव्हां बंदूक सोडल्यानें त्या कोंड-
ले जाग्यांत हकमाचे शेजारीं धूर झाल्यामुळें चोरावर
त्याची नजर गेली नाहीं. मग तो मरून पडला आहे
असें पाहून हकम आपले बायकोस म्हणाला आतां
उदईक याची पूस तपास झाली तर विना कारण पं-
चाईत येऊन पडेल यास्तव याला नेऊन आपले बागेंत
पुरून टाकावा असें म्हणून तो मुर्दा उचलून बागेंत
गेला. इतक्यांत चोर उठोन दरवाज्या बाहेर उभा राहि-
ला आणि हकमाचे बायकोस म्हणाला हा चोर आप-
ला आप्त आहे याजकरितां याला कफन करून पु-
रावयाचा आहे यास्तव ती चादर दे तें ऐकून त्या स्त्री-
नें आपला नवराच मागतो असें समजून चादर आ-
णून त्याचे हातांत दिली. ती घेऊन चोर निघून गेला.
इकडे हकमानें तो मुर्दा बागेंत गाडून परत आला तों
बिछान्यावर चादर नाहीं तें समजीं बायकोस विचा-
रूं लागला चादर कोठें आहे ती म्हणाली तुम्हीं त्या-
मुर्द्यास कफन करण्या करितां मागून नेलीत आतां चा-
दर कशाची उद्यां दुसरी घेऊन या. तें समजतां हकम-

आपले मनांत समजला कीं, हें कृत्य चोरानें करून चादर घेऊन गेला. दुसरे दिवशीं चादर घेऊन हुक-मा जवळ आला ते समयीं हुकूम म्हणाला कायरे - रात्रीस मी तुला मारला होता तूं आलास कसा चोर-म्हणाला मला कांहीं इजा झाली नाहीं तुह्मीं जो बा-गेंत मुर्दा पुरला तो निराळाच आहे ते समयीं हुकूमा-ची बालंबाल खात्री झाली. आणि म्हणाला आतां देवळांतील काजीस घेऊन जा ते समयीं चोर म्हणा-ला तें माझें काम नंतर हुकूम म्हणाला यानें घोडा ने-ला तो पशू होता व चादर नेली ती निर्जीव होती आ-तां मात्र ही गोष्ट याच्यानें कदापि होणार नाहीं कार-ण काजी हा चांगला विद्वान आहे तो कधींही चोरला जाणार नाहीं. इकडे चोरानें मध्य रात्रीचे सुमारास एका पोत्यांत कांहीं खेंकडीं व मेणबातींचा जुडगा अशीं घालून हातांत एक कंदील घेऊन देवळाजव-ळ आला आणि तेथें आल्यावर त्यांतील एक एक खेंकड्याचे पाठीवर मेणबात बसवून ती पेटवून-देवळा जवळ जें कबरस्थान होतें तेथें सोडूं लागला

अशीं हजारों खेंकडीं सोडलीं आणि देवळांत येण्या पूर्वी आपल्यास चांगले सफेन केंसांची दाढी नयार क- रून आणिली होती ती मेणावर लावून दिली व झगा आंगांत घालून देवळांत गेला. आणि मोठ्यानें बोला वयास लागला चलाहो चला उद्यीक जगाचा शेवट- चा दिवस आहे ईश्वरा कडून बोलावणें करण्या करि- नां मी आलों आहें जे अगोदर जातील त्यांचा न्याय परमेश्वर अगोदर करील त्याला मजबरोबर यावया- चें असेल त्यानीं या पोत्यांत शिरावें म्हणजे थोड्या अवकाशांत स्वर्गास जाणें होईल. या प्रमाणें भाष- ण फारच मोठे आवाजानें केलें तें देवळा जवळच का- जी रहात होता तें त्याणें संपूर्ण श्रवण करून बाहेर आला आणि पहातो तों त्या देवळा समोंवती कितीं- एक दिवे लागले असून ते चालतात असें पाहिलें- त्या वेळेस त्याला अद्भुत चमत्कार वाटला आणि- त्यानें त्या वेळेस अशी कल्पना केली कीं, हीं मृतम- नुष्यें सारीं आप आपल्या अस्थी गोळा करीत आहे- त असें त्यास वाटलें ते वेळेस त्याचे मनाची पक्की खा-

श्री झाली म्हणून आपले चाकरास म्हणाला कसें का-
य आहे तुजला स्वर्गास येण्याची इच्छा असेल तर
आपण उभयतां या परमेश्वराचे दूताबरोबर जाऊं त्य
ला चाकर म्हणाला जर तुह्मी जात असाल तर मीही
येतों असें म्हणून उभयतां चोराजवळ आले आणि
त्याचें तें सोंग पाहून फारच चकित झाले. तंतर त्यानें
आपले जवळ जें पोतें ठेविलें होतें त्यांत शिरले. तेउभ
यतां शिरतांच चोरानें तोंड बंद करून थोडे अवकाशानें
तें पोतें उचलून पाहिऱ्या खालीं लोटून दिलें त्या यो-
गानें त्या दोघांचीं कपाळें व आंग बरींच मऊ झालीं ते स
मयीं चोर म्हणाला तुह्मीं काळजी करूं नकां थोडी इजा
झाल्या सारखें वाटेल खरें कारण परत्तून आपण मो
ठे पर्वतांतून अतिवेगानें जात आहों थोडे अवका-
शांत स्वर्गांत पोंचूं असें म्हणून तें पोतें खांद्यावर घे-
ऊन निघाला आणि हकमाचा जेथें बदक खाना हो
ता त्याचें दार उघडून पोतें आंत ठेविलें ते समयीं-
ती बदकें आपले पंख झाडूं लागलीं तेव्हां काजी-
म्हणाला बाहेर काय वाजत आहे, चोर म्हणाला

येथें नाना प्रकारचे पशुपक्षी आहेत. हें देवानें घर-
आहे, थोडी रात्र आहे म्हणून तुह्मास यावेळेस बा-
हेर काढीत नाहीं. सकाळीं परमेश्वर स्वतःयेऊन हीं
संपूर्ण लक्षावधी पोतीं आहेत तीं आपले ज्ञानानें सो-
डील आणि त्यांचा न्याय करील तुह्मीं तोंपर्यंत स्व-
स्थ असावें कांहीं गडबड करूंनये. असें ऐकून ते दो-
घे स्वस्थ बसले नंतर चोर तेथून निघून आपले घरीं
गेला आणि पहांट होतांच हकमाचे घरीं येऊन त्या-
स भेटला तेव्हां हकम म्हणाला कसें काय काजी को-
ठें आहे चोर म्हणाला आपले बदक खान्यांत ठेविला
आहे ते समयीं हकमानें जाऊन पाहिलें तों पोत्यांत
बांधून ठेविला आहे मग पोतें सोडून त्यास बाहेर
काढिलें आणि विचारिलें कसें काय आहे ? येथें अ-
शा अवस्थेनें येण्याचें कारण काय तेव्हां सर्व हकी-
कत निवेदन केली तें श्रवण करून हकमाची खात्री
होऊन गेली कीं, हा फारच कठीण मनुष्य आहे या-
स्तव याला येथें राहूं देणें उपयोगीं नाहीं सबब नि-
घून जाण्या विषयीं त्यास आज्ञा केली ते समयीं चो-

र म्हणाला तूं या गांवचा हकम आहेस आणि जा-
म्हणशील तर मला हा गांव सोडणें भाग आहे परं-
तु तूं आपले वचनाची काय योजना केलीस तें सांग
हकम म्हणाला ही वेळ वचन रक्षणाची नव्हे तुझ्या
सारख्यास येथें राहूं दिलें असतां मोठें अपायास
कारण होईल यास्तव तसें करण्यास मला हिम्मत
होत नाहीं या करितां तूं कृपाकरून येथून निघून
जा तेव्हां त्याचाही नाइलाज झाल्यामुळें निघोन गेला.

## कथा १९ वी.

### लोभी व विचारशून्य बादशाहाची.

एका नगरांत एक बादशाहा राज्य करीत हो-
ता तो स्वभावानें अतिशय लोभी असे यामुळें त्यानें
आपले राज्यांत नाना प्रकारचे कर व नाना प्रकारच्या
कानू बसवून प्रजेला अतिशय त्रास दिला होता को-
ठें कोणास पोट भरण्यास आधार बिलकुल राहिला
नाहीं. मुलखांत पाऊस पाणी चांगलें असल्यामुळें-
जमीनी चांगल्या पिकत असत परंतु राजाचा कर फार

म्हणजे भूमीचे उत्पन्नांतून सहावा भाग राजानें घ्यावा असा पूर्वापार नियम असतां ही बादशाहा प्रजे पासून अर्धा भाग घेऊं लागला. यामुळें जें धान्य अथवा कोणताही पदार्थ उत्पन्न करावा तो अर्धा राजास जात असे यामुळें शेतकरी दरिद्रावस्थेंत असत व व्यापारी लोकांस व्यापारांतील जो नफा राहील तो निमें राजास द्यावा लागे, कारागीर लोकांस जो पैसा मिळे त्यांतून तो धाई देणें पडे. शिवाय नाना प्रकारच्या जकाती तर जागो जागीं बसविल्या होत्याच यामुळें गवत, लांकडें पान पत्रावळी, भाजी पाला, वगैरे सर्व मालावर जकात असल्यामुळें सर्व जिन्नस महाग विकणें भाग पडे या प्रकारें अनेक रीतीचा प्रजेस त्रास सोसावा लागे यामुळें कोणास पोटभर अन्न ही मिळणें कठीण झालें या शिवाय अपराधी लोकांस त्यांचे ऐपती प्रमाणें द्रव्य दंडच होत असे चाकर माणसांस वेतनें फार थोडीं असत यामुळें कामगार ही प्रजे पासून अतिशय लांच घेत असत यामुळें या बादशाही मध्यें कोणास कधींच सुख लेशही माहीत नाहींसा

झाला या मुळें चोरटे फार उत्पन्न होऊन प्रजेला पी-
डा करूं लागले. द्रव्य खर्च होईल या काळजी मुळें -
बादशाहाजवळ फौज ही फार नवती यामुळें त्याचे
कारभारी व सरदार लोक निरंतर परचक्राची भीती-
बाळगीत असत त्यांनीं बादशाहास बहून प्रकारें बो-
ध केला परंतु तो कोणाचें च ऐकत नसे या प्रकारें-
रयते पासून द्रव्य संपादन करून नाना प्रकारचें ज-
वाहीर खरेदी केलें आणि ती संपूर्ण संपत्ती बादशा-
हानें एका मोठे विस्तीर्ण महालांत मांडून ठेविली-
होती. व रात्रंदिवस तेथेंच तो बसत असे यामुळें -
कितीएक दरबारांतील मोठीं मोठीं महत्वाचीं कामें
देखील बंद पडल्या मुळें कोणास कांहींच उपाय-
सूचेना सर्वांची अक्कल गुंग होऊन गेली.

हें वर्तमान बादशाहाचा एक गुरू यवन हो-
ता त्याजला समजलें तेव्हां त्याजला ही या विष-
यीं काय करावें हें सूचेना परंतु तो मोठा अक्कल
वान होता त्यानें बहून प्रकारें आपले मनाशीं वि-
चार करितां करितां युक्ति सूचली. नंतर बादशाहा-

कडे गेला तेव्हां बादशाहानें त्याचें आगत स्वागत उत्त-
म प्रकारें करून मोठे सन्मान पूर्वक सिंहासनावर ब-
सविलें आणि कां येणें केलें म्हणोन विनंति केली. ते स-
मयीं मुल्लाजी म्हणाला तुह्मांजवळ कांहीं विनंति कर-
ण्या करितां आलों आहें, हें ऐकून बादशाहा म्हणाला
मजपाशीं द्रव्य मागूं नको दुसरें कांहीं बोलणें असल्या
स बोलावें ते समयीं मुल्लाजी म्हणाला तुजला द्रव्य तर
काय परंतु कोणतीच वस्तू मागत नाहीं. हें ऐकून बादशा-
हा खुष झाला आणि मुल्लाजीची तारीफ करून त्यास ह्म-
णाला काय आज्ञा आहे मुल्लाजी म्हणाला माझें म्हातार
पण फार झालें शरीरांत तकवा बिलकूल राहि ली नाहीं.
या मुळें कोणते वेळेस मरण येईल हें समजत नाहीं या-
स्तव ही माझे जवळ सोन्याची सळई डोळ्यामध्यें सुरमा-
घालण्याची आहे ही माझे फार प्रीतीची आहे ह्नीमजला
समागमें स्वर्गास न्यावयाची आहे परंतु ती माझ्यानें ने-
ली जात नाहीं म्हणून तुजकडे आलों आहें तरि ही सळ-
ई तूं आपले जवाहीर खान्यांत ठेव आणि जेव्हां तूं आप-
ला संपूर्ण जवाहीर खाना घेऊन स्वर्गास येशील तेव्हां-

ही आपले बरोबर घेऊन ये आणि त्या बद्दल भाडें मज-
पाशीं तेथें मागूं नको येथें पाहिजे असल्यास माग मीं
पाठवून देईन तेथें मला द्यावयास एक पैसा देखील मि-
ळणार नाहीं म्हणून एवढी माझी विनंती अगत्यानें मा-
न्य केली पाहिजे.

या प्रमाणें मुल्लाजी याची विनंती ऐकून बादशा
हा आपले मनांत विचार करूं लागला तेव्हां त्यास कळ-
लें कीं, आपले बरोबर आपला जवाहीर खाना जाणार-
नाहीं ही गोष्ट खरी आहे फार काय आपण मेल्यावर आ-
पणास जें कफन करतील तें ही वस्त्र कबरस्थानांतच-
राहील तेव्हां जवाहीर खान्याची परवा काय आहे तेव्हां
काजी म्हणतो ही गोष्ट खरी आहे असा आपले मनांत
विचार करून काजीस म्हणाला आपले विनंतीचा मी-
विचार करितों आपण आपले मकाणास जावें.

काजीनें बादशाहाची रजा घेतल्यावर तेथून नि-
घून दिवाण व सरदार यांजकडे गेला आणि त्यांस सां-
गितलें कीं, बादशाहास आज चांगला उपदेश केला -
आहे त्या योगानें तो बहून करून चांगला ताळ्यावर

येईल तुह्मीं त्याजला उपदेश करावा. जेणें करून प्रजा बादशाहा विषयीं जा बेदील झाल्या आहेत त्या रूपस न्न होतील. असें करा. म्हणजे बादशाहास व सर्व प्रजेस चांगलें सुख होईल हें ऐकून त्यांनीं ही बादशाहाजवळ तोच क्रम चालविला. बादशाहानें सर्वांचें बोलणें ऐकून आपले मनांत विचार केला कीं, जर जवाहीर खाना आपले बरोबर नेला जाणार नाहीं व आपण चिरकाल वांचणार नाहीं तर मग विना कारण प्रजेला पीडा तरीं कां असावी आज या जवाहीर खान्याकरितां सर्व प्रजा आपले जवळ बेदील झाल्या आहेत पदरीं फौजही नाहीं जर एखादे वेळेस शत्रू उत्पन्न झाला तर हा जवाहीर खाना मात्र लुटून नेईल व आपले जीविता विषयींच पंचाईत येऊन पडेल व आपले मरणा नंतर सर्व प्रजा ह्मणतील कीं, दुष्ट बादशाहा होता बरा मेला तर त्या सर्व अडचणी दूर कराव्या हें बरें आहे असा विचार करून दिवाण व मुत्सद्दी वगैरे मंडळीचा दरबार भरून त्यांस सांगितलें कीं, आमचे आज पर्यंतचे जे विचार होते ते आह्मीं आज सर्व रहित के-

ले आहेत. या उपर जेणें करून प्रजेला सुख होऊ-
न मुलखाचा उत्तम प्रकारें बंदोबस्त राहील व आम-
चे मरणा नंतर आह्मा करितां सर्व हळहळतील अशीं
जीं जीं कामें असतील तीं तीं सर्व करावीं.

याप्रमाणें बादशहाचा हुकूम होतांच सर्व दरबा-
री मंडळीस बहूत आनंद झाला. तंतर त्यानीं संपूर्ण ज-
वाहीर खाना विकावयास बाहेर काढिला व पुष्कळ फो-
ज ठेविली व मुलखांतील प्रजेवर जे जे जुलमी कर ब-
सविले होते ते सर्व काढून टाकिले व प्रजे पासून राज
नीति प्रमाणें वसूल घेण्यास आरंभ केला. त्या योगानें
सर्वांस अतिशय सुख होऊन संपूर्ण प्रजा बादशाहाचें
कल्याण चिंतू लागल्या मुळें जें सुख जाहलें तें त्या
बादशाहास जवाहीर खान्याचे शंभर पट जास्त भा-
सूं लागलें तेव्हां विचार केला कीं, या इतक्या सुखा-
स मूळ कोण तेव्हां काजीचा उपदेश हें मूळ आहे अ-
सें समजून काजीस आपले दरबारांत बोलावून त्या-
स मोठा मान दिला. आणि विनंति करिता झाला कीं,
मला परमेश्वरानें बादशाही दिली असोन तिनें सुख

मी आपले मूर्खपणानें गमावीन होतों फार काय सांगावें माझे आचरणानें शेवटीं माझे जिवाची ही मला चिंता प- डली असती. परंतु त्या सर्व प्रळयांतून तूं मजला पार- पाडिलेंस हा तुझा मजवर मोठा उपकार झाला. व जी- बादशाही परमेश्वरानें मला दिली आहे तिचें सुख तु- झ्या उपदेशा पासून जें मला प्राप्त झालें तसें त्यापूर्वीं कधींच अनुभवलें नाहीं म्हणून तूं मजपाशीं जें माग- शील तें तुला देण्यास मी तयार आहें. काजी म्हणाला जर परमेश्वरानें तुला अशी बुद्धी खरोखर दिली आहे तर या पेक्षां मी तुजपाशीं आणखी तें काय मागूं जें म- ला पाहिजे होतें तें सर्व मिळालें आहे यास्तव आपलें- राज्य उत्तम प्रकारें चालीव म्हणजे सर्व देणग्या मला पो- चल्या याप्रमाणें काजीचें बोलणें ऐकून मग तर बाद- शाहाची फारच भक्ति त्या काजीवर बसली. आणि तो- बादशाहा आपले राहिलेलें आयुष्य सुखानें घालविता झाला.

## तात्पर्य.

राजानें सुख हेंचकीं, प्रजांचें पुत्रवत्पालनक- रणें म्हणजे सर्व विघ्नें नाश पावतात. व त्या योगा-

नें ईश्वर संतुष्ट होतो म्हणून सर्वांस सुख होतें.

समाप्त.

---

# मनोरंजक कोडीं.

अद्याक्षरारहित नें जलकर्षणासी॥ मध्याक्षरारहित नें पशुभक्षणासी॥ अंत्याक्षरारहित सर्व गृहांत आहे॥ सर्वाक्षरांमिळुनि सर्वगृहांत राहे॥१॥ नाडा, कोंडा, कोंना= कोनाडा.

जमाखर्ची पाहे प्रथम वरणा सांडुनि सवें॥ द्वितीया सोडोनी निरखि बहुधा धान्य बरवें॥ तृतीयाक्षरा सोडोनी निपजत भला शालित सुखें॥ मिळोनी तीन्ही ही बहुत जन खाती निज सुखें॥२॥

नाळे, राळे, राता = रानाळे.

अर्धबहु जन द्वारे ष्वर्धंच शिशु शिक्षणे॥ नत्सांशयना गारे यो जानाति स पंडितः॥ (आड, कि... अर्धे जेवणांत सार॥ अर्धे धरी सूतिका द्वार॥ त्यार जन रिझे फार॥ हें जाणेतो पंडित॥ (कदी, लिंब

अर्धे जीवांस मिळे, अर्धे वृक्षांस येत बहुसाल ॥ तें सगळें वाण्याचे घरीं मिळतें स्वल्प देउनी मोल ॥१॥

(काय, फळ)

अर्धे सर्वांस असे अर्धे वृक्षास येत परिणामीं ॥ तें सगळें थोड्याशा द्रव्यानें मिळतसे बहु नामी ॥१॥

(माय, फळ)

अर्धे विचारि त्यासीं उत्तर अर्धे हि सर्व वृक्षांसीं ॥ तें सगळें खायाला मिळतें पशु मानवांसिं पक्षांसीं ॥१॥

(जाय, फळ)

अर्धे इक्षुसमुद्भव अर्धे नगशिरीं विलास पावे तें ॥ तें सगळें नापातें हरितें करितें हि अमृत हेवे तें ॥१॥

(गुळ, वेल)

आद्याक्षरा रहित तो बहुतां भराया, मध्याक्षरा-रहित तो न ठरेचि राया ॥ अंत्याक्षरा रहित तें भ-रुना खिकारी, सर्वाक्षरां मिळुनि तो करितानि-हारीं ॥१॥ हारा, पारा, पाह = पाहारा.

आद्याक्षरारहित तें पक्वान्नि साजे, मध्याक्षरा-रहित बाळमुखीं विराजे ॥ अंत्याक्षरा रहित पिं-

पळ शोभताती, सर्वाक्षरांसह विहंगम बो
नाती ॥१॥ खा, पावा, पार = पारवा.
प्रथम अर्ध पाताळीं नृपति दुसरें करिती
॥ सर्व मिळुनियां लोहो विराजे व्हार क
काजें ॥ (अहो, रण)
प्रथम अर्धनें तेल गाळिती, द्वितिय अर्ध ने
ख सांगती ॥ सर्व पाहुनी लोक त्रासती, सां
कायनें चालल्या मती ॥ घाणे, रडें = घाणे रडे
अर्धे गृहांत राहे अर्धे बागेस शोभवी ख्वा
ते सगळें उद्भवलें उंच परी कठिण फारसें अ
नारी, केळ = नारीकेळ
अर्धे कुटुंब पोशी, यवनी भाषेंत अर्थ वद
तें सगळें मोठाल्या शहरीं सर्व गृहांस अस
ती ॥१॥ शेत + खाना = शेतखाना.

याच्या पुढील भागांत बिरबल बादशाहा
गोष्टी फार मनोरंजक आहेत.